


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.








अनुक्रमणिका

किर्लोस्कर

# पॉवरसंबंधित असे आपले सर्व प्रश्न सोडविण्यासाठीं...



" शेतीसाठीं शक्तिचा पुरवठा करणारें उत्कृष्ट साधन पाहातां आहांत!
**किर्लोस्कर ५ हॉर्स पॉवर** डिझेल एंजिन घ्या. तें फारच किफायतशीर पडतें आणि चालविण्यासाठी अगदी सोपें; इतकें कीं कुणीही कामगार तें सहज चालवूं शकतो.

" याखेरीज किर्लोस्कर **१० हॉर्स पावरचें एव्ही**-२ आणि २० **हॉर्स पॉवरचें वी-२** अशी डिझेल एंजिनें आहेत. बांधकामाचीं यंत्रें, भाताच्या आणि पिठाच्या गिरण्या इत्यादि यंत्रें चालविण्यासाठीं हीं एंजिनें अगदी सर्वोत्कृष्ट आहेत.

" याहून अधिक मोठ्या शक्तिच्या एंजिनांची तुम्हांला गरज आहे का? तर मग **४० हॉर्स पॉवरचें वी-४** किंवा **२१० हॉर्स पॉवरचें किर्लोस्कर एम. ए. एन.** डिझेल एंजिन खरीदा. कमित कमी इंधनाचा खर्च व भरपूर शक्ती-पुरवठा, शिवाय रात्रंदिवस हीं एंजिनें चालू ठेवण्यांत त्रासाचा संभव नाहीं.

" आणि हें पहा, यांपैकीं प्रत्येक एंजिन अव्वल दर्जाचें असते. कारण त्यांच्या निर्मितीमागें अनेक वर्षांचें संशोधन आहे. जास्तींत जास्त किफायतशीर, कमित कमी लक्ष पावें लागणारें, चालविण्यास सोपें आणि वर्षानुवर्षें बिनतक्रार काम..... या सर्व गोष्टी **किर्लोस्कर** डिझेल एंजिन घेतल्यानें मिळतात. यांपैकीं कोणतेंहि एंजिन खरीदा; माझें म्हणणें खरें असल्याचा अनुभव आपल्यालाही येईल."

# डिझेल एंजिन



वी-२, २०
हॉर्स पॉवर



वी-४, ४०
हॉर्स पॉवर



किर्लोस्कर
एम. ए. एन.
२१० हॉर्स पॉवर

TOM & BAY KOEL/M-15 61

## किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड
खडकी, पुणें-३ (भारत)

वर्ष १८ वें

ऑक्टोबर १९६२

# दीपावली

आहित्य • कला • संगम

## श्रेयनामावलि—



सदरें:—




दलाल आर्ट स्टुडिओ : ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

*संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ * या प्रतीस किंमत रु. १ अधिक रजिस्टर पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. * या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. * या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओला स्वाधीन आहेत.



टेलिफोन
७७७६५









जयदेवः—

## कविता कामिनीची माधुरी

**मधुर कोमल कान्त पदावलिम्–श्रुणु सदा जयदेवसरस्वतिम्।।**

हिमालय हाच जगांत सर्वांत उंच पर्वत होय. गंगा हीच जगांतील शुचितम नदी होय. शुक्र हीच आकाशांतील सर्वांत रम्य चांदणी होय. त्याचप्रमाणें जयदेवकवीची 'गीतगोविंद' हीच जगांतील शृंगाररसपर भावकवितांतील सर्वांत मधुर कविता होय. जगांतील सर्व भाषांत संस्कृत हीच मधुरतम भाषा आहे; आणि गीतगोविंद हें संस्कृतांतील मधुरतम काव्य आहे. ही गोष्ट भूत आणि वर्तमानकालीं जेवढी अबाधित राहिली आहे तेवढीच भविष्यकालीही अबाधित रहाणार आहे. हिमालयापेक्षां अधिक उंच पर्वत निर्माण होण्याची शक्यता असली तरी गीतगोविंदापेक्षां अधिक मधुर काव्य निर्माण होऊं शकेल.

जयदेवाच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे हें काव्य वासुदेवाच्या रतिकेलीचें वर्णन करणारें आहे; अर्थात् शृंगारकाव्य आहे. यांत अथपासून इतिपर्यंत शृंगारच भरला आहे, याचा निरामय रसिकाला संदेह वाटावयास नको. या गीतावर भक्तिरसाचा आरोप केला जातो. एकांताच्या भ्रान्तीनें आपण कांतेच्या अधराचें पान करीत असतांना अवचित कोणी आपणास पाहिलें कीं आपण म्हणतो, "प्रियेच्या नयनांत धूलिकण गेला होता तो जरा फुंकर मारून उडवीत होतो." गीतगोविंदाचा आस्वाद निरामयपणें घेण्याऐवजीं तो घेतांना विकृत संकोच वाटला की मग, शृंगार माधुरीचा मोह तर आवरत नाहीं, आणि संकोच तर सुटत नाहीं, अशा अवस्थेत, मन या शृंगारावर भक्तीचा आरोप करून आपलें समाधान करून घेत असतें. मन निरामय असेल तर कांताच्या करकमलांत लालनासाठीं म्हणून आपलें सुडौल स्तनमंडल अर्पण करणाऱ्या कांतेच्या समर्पणाला भक्ति न म्हटलें तरी त्यांतील रसाची माधुरी मुळींच उणी होणार नाहीं.










अनुक्रमणिका

अनादिकालापासून मोर या पक्षाबद्दल भारतीयांना अपार प्रेम. विद्यादात्रीनें त्याला आपलें वाहन म्हणून पसंत केला.

विजयादशमीला केवळ त्याची पूजा केल्यानेंहि पुण्य लाभतें, असें शास्त्रांत सांगितलें आहे. महाकवि मोरोपंतांनीं स्वतःला त्याचें नांव घेऊन महाकाव्यें रचिलीं. अशा या सुंदर पक्षाला राष्ट्रीय पक्षी म्हणून मान मिळालेला आहे.

याच महिन्यांत सरस्वतिपूजन असल्यानें या लेखांतली माहिती वाचकांना उद्बोधक वाटेल..............



# भारताचा राष्ट्रीय पक्षी

देवदेवतांचा पक्षी आणि सर्व पक्ष्यांचा राजा, असें अनादिकालापासून ज्या पक्षाचें वर्णन केलें जातें, तो मोर, भारताचा राष्ट्रीय पक्षी ठरण्यांत एकप्रकारचें औचित्य आहे. याचबरोबर, हाच पक्षी राष्ट्रीय ठरविण्यास आणखीहि एक फार मोठें कारण आहे. आणि तें कारण म्हणजे, त्या पक्षाची मूळ भूमि भरतखंड हीच आहे, हें होय. फार प्राचीन काळापासून सिलोन व ब्रम्हदेश हे भरतखंडाचेच भाग मानले जात. पण अगदीं अलिकडे हे दोन्ही देश भारतापासून अलग करण्यांत आले. या देशांतहि, मोर वैपुल्यानें असले तरी, हे देश मूळचे भरतखंडाचे म्हणून मोर हा पक्षी मूळचा भरतखंडाचाच. यासाठींच या पक्षास राष्ट्रीय पक्षी ठरविण्यांत फार मोठें औचित्य आहे.

शिवाय यास देवदेवतांचा पक्षी असें मानलें जातें. देवांचा सरसेनापती जो कार्तिकेय याचें वाहन मोर आहे असें फार प्राचीन काळापासून मानलें जातें. कार्तिकेयाच्या ज्या अनेक मूर्ति दिसून येतात, त्यामध्यें मोराची प्रतिकृति कोरलेली असल्याचें दिसून येतें. कोल्हापूर वस्तुसंग्रहालयामध्यें कार्तिकेयाच्या दोन शिल्पकृति आहेत. त्यांपैकीं एक पन्हाळा येथें मिळून आलेली व दुसरी कोल्हापूर येथें मिळून आलेली आहे. पन्हाळ्याची शिल्पकृति ११ व्या शतकांतली असून, ती भग्नावस्थेंत आहे. कोल्हापूर येथें मिळून आलेली दुसरी शिल्पकृति ११ ते १२ व्या शतकांतली आहे. पहिल्या शिल्पकृतींत कार्तिकेयाचें वाहन म्हणून मोराची सुंदर आकृति कोरलेली आहे. दुसरें शिल्प 'शिव पार्वति सोमस्कंध' या नावाचे असून, या शिल्पकृतीचे खालील डाव्या कोपऱ्यांत, मोरावर आरूढ झालेली स्कंधाची लहानच पण सुबक आकृति आहे. कार्तिकेयास स्कंध असेंहि म्हणतात. यावरून मोर हा कार्तिकेयाचें वाहन होता असें मानण्यास कोणतीच हरकत नाहीं. याबरोबरच देवी सरस्वतीसुद्धां या पक्षाच्या नयनमनोहर स्वरूपावर आकर्षित झालेली होती. हंसवाहिनी म्हणून देवी सरस्वतीस संबोधिलें जातें. पण देवी सरस्वतीला आपल्या वाहनाचा विसर पडण्याइतके, विलोभनीय सौंदर्य मयूराच्या ठायीं आहे, म्हणून तिनें त्याला आपलें सान्निध्य नित्याचेंच बहाल करून ठेविलें आहे. यामुळें हा देवदेवतांचा पक्षी.

असा हा पक्षी भारताचा राष्ट्रीय पक्षी होण्यास सबळ कारण आहे. या पक्षास राष्ट्रीय पक्षीपदाचा मान मिळण्यास त्याचें अनुपम सौंदर्य हेंहि कारण आहेच. तो पक्षी खरोखरच सुंदर आहे. त्याच्या मस्तकावरील तो तुरा आणि त्याच्या मागचा तो पिसारा, यांचे वर्णन करण्यास शब्द अपुरे पडतात. साक्षात सरस्वतीच ज्याच्यावर निहायत खूष, तिथें तिचे जे उपासक सारस्वत त्यांची कथा काय ? मोराच्या पिसाऱ्याचें नयनमनोहारित्व नितांत रमणीय आहे. जेव्हां शिकंदरानें भारतावर स्वारी केली, तेव्हां त्या स्वारींत येथील मुक्कामांत त्याला, नदीच्या तीरावरून स्वैर विहार करणाऱ्या या पक्षाचें रमणीय रूप इतकें मोहीत करतें झालें, कीं त्यानें त्या पक्षाची हत्या करण्यास बंदी घालणारें फर्मान काढलें. याहि पूर्वी ज्या वेळीं भारताचा पश्चिमेशीं व्यापार–उदीम चालत असे, त्यावेळीं भारतांतून बोटी भरून माल युरोपांत जात असे. या बोटींतून जें सोने, चांदी हस्तिदंत, वानर नेले जात त्याबरोबरच मोरहि नेले जात. मोर पक्षावर त्या वेळचा राजा सालोमन निहायत खूष होता. हा राजा या पक्षावर इतका मोहित झाला होता, कीं भारतांतून येणाऱ्या जहाजांची तो आतुरतेनें मार्गप्रतिक्षा करीत असे. आपले भारतीय कवि तर मोराच्या सौन्दर्यावर इतके भाळून गेले होते, कीं त्यांनीं आपल्या अधिष्ठात्री देवतेस–हंसवाहिनी सरस्वती देवीस, मोराचें वाहनच बहाल करून टाकलें. सातशे वर्षांपूर्वी दिल्लीचा सुलतान कुतुबुद्दीन मुबारकशहा याच्या पदरीं अमीर खुसरो नांवाचा एक फार मोठा कवि होऊन गेला. 'नुरे सिपेहर'–नवे आकाश नामक आपल्या ग्रंथांत, मोराचें वर्णन करतांना अमीर खुसरो म्हणतो 'भारतांतील मोरांची प्रशंसा करावयास तर शब्द अपुरे पडतील!' यावरून मोराचें अतुलनीय सौन्दर्य वादातित आहे हें स्पष्ट होतें. अशा

वादातित सौन्दर्यसंपन्न पक्षास, भारताच्या राष्ट्रीय पक्षाला मान द्यावयाचा नाहीं तर मग कोणत्या पक्षाला ?

निसर्ग सौन्दर्यानें नटलेल्या या भारतवर्षांत तुम्ही कुठेहि जा, आणि केव्हांहि जा, इंद्र-रंगांशीं स्पर्धा करणाऱ्या पिसाऱ्यानें विभवलेला हा मोर दृष्टीस पडतोच पडतो. या पक्षाची बरोबरी इतर कुठलाच पक्षी करूं शकणार नाहीं. हा पक्षी अनादिकालापासूनचा आहे. पुरातन कालीं, राजे महाराजे जेव्हां दरबारांत बसत, तेव्हां त्यांच्या मोर्चेल व अबदागिरीची शोभा या मयूर पंखानें वाढविलेली आहे. वाळ्याच्या पंख्यांत श्रीमंती वैभव असलें तरी मयूर पिसांच्या पंख्यांत राजेशाही मिजास आहे. भारतांत तर या पिसांना अनन्य-साधारण महत्त्व दिलें जातें. देवदेवतांच्या सान्निध्यांत हा मयूर पंखा सततच असलेला आढळून येतो. हिंदुंच्या देवळांतच नव्हे तर बुद्धांच्या विहारांत, ग्रीक, सीरिया, इजित या देशांतील धर्ममंदिरांतहि या पक्षास स्थान असल्याचें आढळून येतें. जैनमुनींच्या हातांत मोर पिसांचा पंखा असण्यानेंहि कारण हेच होय. भारतांत जेव्हां परदेशचे प्रवासी येतात तेव्हां त्यांना सर्वत्र विक्रीस ठेवण्यांत आलेले हे पंखे पाहून ते घेण्याचा मोह टाळतां येत नाहीं. आग्रा शहरांत, ताजमहाल शेजारीं तर हे पंखे हजारोंनी खपत असतात. ग्रीक साम्राज्य जेव्हां वैभवाच्या शिखरावर होतें तेव्हां या पक्षाविषयीं लोकांत, थोरामोठ्यांत इतकी अप्रतिम आवड होती कीं मोराच्या एका जोडप्यास ३० पौंडाइतकी किंमत देऊनहि असे लोक हे पक्षी संग्रही बाळगीत. ग्रीकांची धर्मपुराणें वाचलीं तर त्यांत मोर हा पक्षी नितांत आदरानें मानला जात असल्याची अनेक उदाहरणें मिळून येतात. त्यांच्यात स्वर्गाची सम्राज्ञी समजली गेलेली, बैलांच्या डोळ्यांची ज्युनो इचा तर हा अत्यंत आवडता पक्षी होता. या ग्रीकांत अशी एक दंतकथा सांगितली जाते कीं ज्युनोने जोवर नजर ठेवण्यासाठीं १०० नेत्र देऊन आर्गस याची नेमणूक केली होती. ज्युनो ही ज्युपिटरची पत्नी व ती ज्योचा अतीव मत्सर करीत असे. अस्थिर हालचालीच्या मर्क्युरीनें आपल्या अंगातील युक्तीप्रयुक्तीनें आर्गसला चकवून त्याला नेस्तनाबूद केलें. यामुळें ज्युनोला फार राग आला. आणि त्या रागाच्या भरांत तिनें आर्गसला शाप दिला. तूं पक्षी होशील व तुझ्या पंखावर तुझे शंभर डोळे दिसतील.' त्या दिवसापासून मोर हा शंभर डोळ्यांच्या पंखांचा पक्षी झाला व ते डोळे म्हणजे वाईट नजर टाकणारे असे मानले जाऊं लागले.

सीरियन आणि येझिदी लोकांमध्यें अजूनहि अशी पद्धति रूढ आहे, कीं ते लोक जेव्हां देवाची पूजा करतात तेव्हां ते सैतानाचा निषेध करतात. सैतान म्हणजे अमंगल, वाईट, दुःखकारक अशी त्यांची समजूत आहे. हा निषेध करतांना ते सैतानाचें नांव घेण्यास सुद्धां धजत नाहींत म्हणून ते त्याचे प्रति-निधित्व मोरास देतात. त्यांच्या धर्मग्रंथांत मोराचा उल्लेख अनेक ठिकाणीं आढळून येतो. वाईटाचें, अमंगलतेचें प्रतिक म्हणून काहीं धर्मांत मोर हा पक्षी धरला जातो तर काहीं धर्मांत त्यास पवित्र आणि मंगल मानून त्याची पिसें देवासनिध्य ठेविलीं जातात व देवपूजेच्या प्रसंगीं वापरलीं जातात.

भारताचा हा पक्षी युरोपांत कुणी आणि केव्हां नेला याची निश्चित माहिती मिळूं शकत नाहीं. कुणी म्हणतात सालोमान राजानें प्रथम हा पक्षी भारतांतून पॅलेस्टाईन-मध्यें नेला तर कुणी ग्रीकांच्या धर्मपुराणातील उल्लेखाकडे बोट दाखवून असें सिद्ध करूं पहातात कीं हा पक्षी ग्रीकांस फार प्राचीन काळीं माहीत होता. अरिस्टोफन्स (ARISTOPHANES) या प्राचीन लेखकाच्या लेखांत या पक्षाचा उल्लेख असला तरी, शिकंदराने भारतावर स्वारी करून हा पक्षी तिकडे नेई-पर्यंत तो इतक्या सविस्तरपणें फारसा कुणाला माहीत नव्हता. एका पुरातन डच चित्रामध्यें मोरासारखा एक प्राणी चितारण्यांत आलेला आहे. प्राचीन काळचे योद्धे जेव्हां इमानदारीच्या शपथा घेत, तेव्हां मोराचाहि उल्लेख करीत. इतक्या आदरास त्याकाळीं तो पक्षी तिथें पात्र झाला होता. इराणच्या शहाचें मयूरसिंहासन आजहि जगाला आश्चर्यचकीत करून सोडीत आहे, ही गोष्ट परवांच इंग्लंडच्या राणीच्या दौऱ्यांत सिद्ध झालेली आहे. या दौऱ्यांतील, इराणमधील वास्तव्याचा बराचसा भाग, हें मयूरसिंहासन पहाण्यांत राणीनें आपल्या पतीसमवेत घालविला. या पक्षाला पश्चिमेंतहि फार आदराचा मान दिला जातो. या पक्षाच्या सौंदर्यावर पाश्चिमात्य फारच भाळले होते. कांहीं खादाडांनीं या पक्षाला मारून त्याचें मांस आपल्या आहार यादींत नोंदविलें. पण हे मांस, सुंदर दिसणाऱ्या मोराचें असलें तरी चवीला तें स्वादिष्ट नसल्या-मुळें, पुढें ही पद्धति बंद पडली. यावरून भारताच्या या पक्षानें फार प्राचीन काळीं परदेश पर्यटन केलें होतें हें स्पष्ट होतें.

रंग, रूप वगैरे दृष्टीनें हा पक्षी फारच सुंदर आहे. त्याच्या मस्तकावरील तो चोवीस पिसांचा तुरा, मोराला मोठेंच डौलदार स्वरूप प्राप्त करून देतो. मस्तकावरील तुऱ्यांतील ही पिसें मध्येंच हिरवीगार असून कडेला पिवळीं असतात. त्याचा गळा, मान व डोळे हे अवयव निळे असतात. या निळ्या रंगावर मधून मधून हिरव्या व पिवळ्या सोनेरी रंगाची झाक मारते. मोराच्या पोटाचा रंग हिरवट काळसर दिसतो. मोराचा पिसारा हा अनेक पंखाचा एक गुच्छच असतो. ही पिसें साधारणतः वीस किंवा त्याहून अधिक अस-तात. या प्रत्येक पिसावर वाटोळा डोळा असून पिसाचा दांडा पांढरा शुभ्र असतो. पिसाच्या कडेला पर असते. पिसाच्या डोळ्याला पिवळा, निळा व हिरवा या रंगाची छटा मारते. पिसारा फक्त नरालाच असतो. मोराच्या मादीला लांडोरी म्हणतात. तिला हा पिसारा नसतो. तिचे जे पंख असतात ते उदी–राखी रंगाचे असतात. मादीचा अनुनय करतांना अगर आकाश मेघाच्छादित होऊन मेघ गर्जत असतांना मोर थुई थुई नाचत असतो. आपला पिसारा अर्ध-वर्तुळाकार पसरून तो जेव्हां थुई थुई नाचूं लागतो, तेव्हांचें तें दृश्य स्वर्गीय होय. तें पहावयास मिळणें मोठें भाग्याचें असतें. मोर उल्हसित होत्साता, उन्मादपूर्ण अवस्थेंत जेव्हां नाचूं लागतो तेव्हां त्याच्या नयनांतून अश्रूंची मौक्तिकें ओघळत असतात. कुणी म्हणतात हे ओघळणारे अश्रू वरच्यावर मादी गिळते व त्यामुळें तिला अंडी होतात. कुणी म्हणतात, तो जेव्हां नाचूं लागतो तेव्हां त्याला आपला मनोहारी पिसारा व डौलदार तुरा अद्वितीय वाटतो पण जेव्हां त्याची दृष्टी त्याच्या ओबडधोबड पायाकडे खिळते त्यावेळीं त्याला खंत वाटून त्याच्या नयनांतून दुःखाश्रू येऊं लागतात. मोराची मादी अंडीं घालते हें खरें; पण ती हे अश्रू गिळून घालते कीं कसे कोण जाणे ! मोराचे पाय ओबडधोबड आहेत हेंहि

कृ. रा. देसाई






अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

खरें पण ते पाहून त्याच्या डोळ्यावाटे दुःखाश्रू येतात कीं कसें कोण जाणे! त्याचे पाय त्याच्या साऱ्या अवयवांत ओबडधोबड असतात आणि त्या पायांस मागील बाजूस, किंचित वर केव्हां एक तर केव्हां दोन नख्या ( SPUR ) असतात. मोराचें घरटें जमिनीवर असतें. तें गवताचें केलेलें असते. जून ते ऑक्टोबर अखेर या घरट्यांत मादी सहापासून पंधरापर्यंत अंडी घालते. ही अंडीं खडबडीत असतात.

भारत, सिलोन, ब्रह्मदेश यांप्रमाणेच जपान व जावा बेटावरहि हा पक्षी दिसून येतो. सिलोनमधील मोर पांढरा असतो तर जावा बेटांतील मोर हिरवा असतो. जपानी मोराची जात एक आगळीच असते. त्याचा रंग पांढरा असतो. इंग्लंडमध्यें सध्यां जे मोर आहेत; ती जपानी मोरांच्या जातीचीच पैदास होय. भारत व सिलोनमध्येंहि या जातीचे कांहीं मोर आणण्यांत आले आहेत. मोरांचा पिसारा दर वर्षाला गळत असतो व वसंत ऋतूंत तो पुन्हां येत असतो. पिसारा गळून पडलेल्या मुदतींत मोर कुणाच्याहि दृष्टीस पडत नाहीं. मोराचा डामडौल बादशाही असला तरी तो लाजाळू, शांत व स्थिरबुद्धि आहे. मोराला पकडणें सोपें नसतें. ती एक दुरापास्त गोष्ट आहे. तो अत्यंत जलद धावतो. तितर अगर कवड्यापेक्षांहि जलद गतीनें तो जातो. आणि घनदाट जंगलांत तो केव्हांच दिसेनासा होतो. तो इतर पक्षांच्या सान्निध्यांत रहात नाहीं. अकेला फिरतो. डोंगराचे उतार, सखल प्रदेश अगर वनराई अशा जागीं तो रहातो. रात्रीच्या वेळीं तो झाडाच्या उंच फांदीवर, घराच्या छपरावर अगर झोंपडीच्या कौंबळावर बसून रहातो.

भारतांत मोरांना राजेरजवाडे, सरदार जहागिरदार हौसेनें पाळतात. याला एकटा दुकटाच पाळायची प्रथा असते. त्याचा खांडच्या खांड कधीं पाळला जात नाहीं. सौंदर्यांत याची ख्याति असली तरी, बागबगीच्यांची नासाडी करण्यांत याचा दुर्लौकिक आहे. साप, किडे, मुंग्या, वगैरेंचा उपद्रव मोर असल्याच्या भागांत होत नसतो. कारण तो त्यांचा फन्ना उडवितो. यासाठींहि मोर पाळण्यांत येतात. मोराच्या सान्निध्यांत साप रहात नाहींत. जावांतील मोर जंगलांत वाघांच्या सान्निध्यांत राहतात. किंबहुना तेथें जंगलांत वावरणारे लोक जंगलांत फिरत असतात तेव्हां त्यांना जर कुठे मोराचे ओरडणें ऐकूं आलें, तर तिथें वाघ आहे अशी खात्री बाळगतात. मोराच्या पायांप्रमाणें त्याचा आवाजहि त्याच्या सौंदर्याशीं विसंगत आहे. तो फार कर्कश आहे. पहांटेच्या वेळीं तो आपल्या आवाजाची द्विरुक्ति करून कर्कशपणें 'माऊ' असा ओरडतो. उन्हाळ्यामध्यें संध्याकाळीं व रात्री नेहमींच तो ओरडतो.

मोराच्या रमणीय नृत्यावर भारतीय नर्तकहि आकृष्ट झालेले आहेत आणि त्याच्या नृत्य प्रकाराला आपल्या नर्तनांत महत्वाचें स्थान दिलेलें आहे. आणि म्हणूनच कथक नृत्याचा प्रयोग मयूर नृत्याखेरीज पुरा होतच नाहीं. भूतानांत ग्रामीण विभागांत नृत्यसमयीं मयूरनृत्य केलें जाते आणि मयुरावहन गाणीं गाइलीं जातात. उत्तर प्रदेशांत आणि आपल्या इकडेहि मोराच्या सौंदर्याला इतके अनन्य साधारण महत्व दिलें जातें कीं, तिथें अशी एक समजूतच पडून राहिली आहे व ती ही कीं, परमेश्वरानें जेव्हां पृथ्वी निर्माण केली तेव्हां त्यास तीन दिवस लागले व उरलेले तीन दिवस त्यानें मयूर निर्माण करण्यास घालविले.

हे मयूरा, तूं देवदेवतांचे प्रीतिस्थान झालास, राजे–महाराजांना मोहिनी घातलीस, प्रतिभाशारदाभक्ताना पंगु करून सोडलेस, चित्रकारांच्या कल्पनांना अखंड स्फूर्ति दिलीस. हे मोरा तुझ्या अमुप नृत्यानें नर्तक-नर्तकींना आकृष्ट करून त्यांना तुझ्याप्रमाणें नाचायला लावलेंस, आणि हे मयुरा, तुझी पिसे बालबालिका मोठ्या आवडीनें आपल्या पुस्तकांत ठेऊन, त्यांना तांदळाचे खाद्य देतात; हेतू हाच कीं, ते तांदूळ भक्षण करून त्यांनी अंडी घालावी व त्या अंड्यांतून असे अनेक पिसांचे मोर निर्माण करावेत. ही तुझ्या विषयींची आकृष्टि, ही तुझ्या मनोहारित्वाची मोहिनी आणि ही तुझ्या नृत्याची आसक्ति आणि म्हणूनच तूंच भारताचा, तुझ्या मायदेशाचा राष्ट्रीय पक्षी होणें सर्वथैव योग्य होय!

• • •

---

( पान ५ वरून )

नाहीं तर काय कुब्जा मिरविणार ? त्यामुळें जयदेव आपल्या वाणीबद्दल डौलानें म्हणतो, "शृंगाररसाचें परममंगल सारसर्वस्व अशी जयदेवाची विदग्ध वाणी जोंवर प्रचलित आहे, तोवर हे मधुरते, मी हिच्याचसारखी गोड आहे असें तूं मानलेस तर त्यांत खरेपणा असणार नाहीं. हे साखरे, तुझ्या नावांतच जिथें खरे आहे तिथें तू गोडीचा गर्व काय वहावा ! हे द्राक्षाफला तुला भ्यावयाचें कारण नाहीं. कारण ही वाणी असेतों तुला मधुर मदिरेसाठीं कोणी पिळणार नाहीं. हें अमृता तुझें नांव बदल. कारण माझ्या वाणीपुढें तूं मृतच झालें आहेस. हे क्षीरा, तुला अभिमान कशाला ? तुझ्यांतील रस म्हणजे नुसतें नीर आहे. हे आम्रफला तू क्रंदन कर. माझा इलाज नाहीं. माझ्या वाणीपुढें तू विफल आहेस. हे कांतेच्या अधरा तू माझ्या वाणीच्या माधुरीशीं तूलना करण्याची आशा धरूं नकोस."

इतकी थोडी कविता लिहून इतकें विपुल यश मिळण्याचें भाग्य एका जयदेवासच लाभलें. हा कवी बाराव्या शतकांत बंगालच्या राजा लक्ष्मणसिंह याच्या दरबारांत होऊन गेला. इतक्या प्रख्यात कवीबद्दल दंतकथा नसतील तरच नवल. त्यामुळें जयदेवाचें दंतकथामय विस्तृत चरित्र उपलब्ध आहे. पण त्याला ऐतिहासिक आधार नाहीं. या दंतकथांप्रमाणें पद्मावती ही जयदेवाची कांता मोठी पतिव्रता असते. राणीकडून तिच्या पातिव्रत्याची परीक्षा घेण्याच्या खटाटोपांत तिला मृत्यू येतो. जी मरण पावल्यावर जयदेव जगन्नाथापुढें धरणें धरून त्याची या चोवीस भावगीतांनी आळवणी करतो, तेव्हां पद्मावती जिवंत होते. पुढें या कवितांच्या कीर्तीमुळें मत्सरी होऊन राजाही कविता करतो. पण जयदेव व राजा यांची कविता जगन्नाथापुढें परीक्षेला ठेवली असतां जगन्नाथ जयदेवाची कविता हृदयाशीं धरून राजाची कविता फेकून देतो. अशा अनेक दंतकथा आहेत. पण या दंतकथांचा जयदेवास आधार नसून जयदेवाचाच दंतकथांस आधार आहे हें काय सांगावयास हवें ! गीतगोविंद हेंच जयदेवाचें चरित्र आहे आणि तें सांगत आहे कीं जयदेव हा माधुरीच्या बाबतींत जगांतील सर्वप्रथम कवी आहे. तो कविता कामिनीची मूर्त माधुरी आहे.

—आनंद साधले

• • •






अनुक्रमणिका





—जयवंत दळवी

# मी ( पण ) प्रेमांत पडतों

त्या कुलीच्या घराण्यापाशीं असलेलें वैर आणि त्या वैरापायीं करावी लागणारी रणधुमाळी ही आबांच्या अंगवळणी पडली होती. तो तर त्यांच्या जीवनांतला एक भागच होता. त्यांत शक्ति, वेळ आणि पैसा यांची अतोनात हानि झाली होती हें खरं. पण तेवढा भाग सोडला तर आबांचें व्यक्तिमत्व कांहीसें वेगळेंच होतें असें म्हटलें पाहिजे.

उंच आणि भरदार प्रकृति. काळसर पण करारी चेहरा. श्वेताच्याच मिशा. नाकावर सोन्याच्या काडीचा चष्मा. दोन भुवयामध्यें लाल गंधाची नाजुकशी टिकली आणि कानांत मोत्यांची भिकबाळी.

डोक्याला रेशमी रुमाल. अंगावर लांब व गेंजरा कोट. नेसतें धोतर तलम पण आंखूड. मुठीला सिंहाचें तोंड बसवलेली काळी शिसवी काठी हातांत. चार आंगळें उंच खोट असलेले गावठी जुतें पायांत. नुसता हा सरंजाम पाहूनसुद्धां कोणीहि लांबून आबांना ओळखावें.

पहांटे परडी घेऊन ते फुलांसाठीं बाहेर पडत, आणि आसपासच्या झाडांवरलीं बरीचशीं फुलें घेऊन येत. पण झाडावरलीं सारीं फुलें ते कधींच खुडत नसत. एखादें तरी फूल ते कटाक्षानें झाडावर ठेवीत. फुलांशिवाय झाडांना शोभा नाहीं असें ते म्हणत असत.

फुलांचा कार्यक्रम झाला कीं शान्त्या न्हाव्याच्या हातांत डोकें देऊन हजामत करून घेत, अंगामाथ्याला तेल चोळून घेत आणि आंघोळीसाठीं विहिरीवर येत. त्यांची आंघोळ म्हणजे कावळ्याचें स्नान नव्हतें. नाऱ्या गडी विहिरीवर उभा राहून घागरी भरून काढायचा आणि घसाघसा आबांच्या डोक्यावर ओतायचा. मग पाठीला साबणहि तोच लावायचा. फक्त शेवटली घागर तेवढी ते स्वतःच्या हातानें काढीत आणि सर्वांगावर रिती करीत. अशा रीतीनें सोवळे होऊन भिजल्या वस्त्रानिशीं देवघरांत येत. तेथें मुकटा नेसून कुलदैवताची पूजा करीत. स्तोत्रें म्हणत, पोथ्यांचें पठण करीत. तास दीड तास पूजा चालायची. त्यांनीं पूजा आटपून देवाला नैवेद्य दाखवल्याशिवाय कोणी जेवायचें नाहीं अशी घरची रीत होती.

जेवणानंतर आठदहा कुळवाड्यांचा अड्डा आमच्या ओव्यावर बसलेला असायचा. कुणी खंड घेऊन आलेला, कुणी खंडासाठीं मुदत मागायला आलेला, कुणी शेजाऱ्यानें मारलें म्हणून तर कुणी नवऱ्यानें मारलें म्हणून तक्रार करायला आलेली.

किरकोळ मारामारीच्या तक्रारी आबा खटले, फिर्यादी करून कधींच सोडवत नसत. ते आधीं देवदेवस्कीच्या कथा सांगत. आपल्या आयुष्यांतल्या विस्मयजनक आठवणी सांगत. आणि मग ऱ्याच वेळानें उभय पक्षांत दिलजमाई करून देत. गांवांतलीं अनेक घराणीं त्यांनीं अशी जवळ आणलीं होतीं. अनेकांचे संसार त्यांनीं जोडून दिले होते. पण हें सारें करीत असतांना जर कां एखादा कुळवाडी रागाच्या भरांत उलट बोलला तर मात्र त्यांना स्वतःचें सुद्धां भान रहात



अनुक्रमणिका





नसे. खांकेला आधारासाठीं घेतलेला लोड झटक्यानें बाजूला फेकून ते धांवत पुढें जात आणि त्याचें कानपट रंगवून टाकीत. पण तरीहि हीं माणसे आबांवर राग धरीत नसत. पुढल्या दारीं मार खाऊन हीं माणसें मागल्या दारीं येत आणि रडत. मग कनवाळूपणानें त्यांना आईकडून अगर आजीकडून नारळ मिळे !

सायंकाळीं किरणें सोनेरी झालीं म्हणजे कोट, रुमाल चढवून ते बाहेर पडत. पुरुषाला माहेर असतें असें म्हटलें तर कुणाला खरें वाटणार नाहीं. पण रवळनाथाचें देऊळ हें आबांचें खरोखरच माहेर होतें.

रवळनाथाचें देऊळ म्हणजे मामुली देऊळ नव्हतें. एखादा राजवाडाच जणुं. भक्तगणांनीं नवसादाखल दिलेली मालमत्ता ढीगभर होती. जमीनजुमला मोठा होता. या देवळाची देखभाल करण्याचें काम पहिल्या मानाचे मानकरी म्हणून आमच्या घराण्याकडे होतें.

या देवळांत आबा रोज तीन चार तास नेमानें घालवीत असत. घराकडून ते निघाले कीं त्यांच्या पाठोपाठ खालीं माना घालून चालणारे आठ दहा लोक तरी हमखास असत. आबांनीं कांहीं विचारलें तरच ते उत्तरें देत. बाकी आबा जें कांहीं म्हणतील त्याला मोठ्या आवाजांत दुजोरा देत. इतर वेळीं शान्तता. या शान्ततेंत जुत्याचा चर्रचर्र आवाज करीत आबा तांबडी धूळ तुडवीत चालूं लागत. जुत्यांचा आवाज हें एक खास वैशिष्टय होतें. नुसत्या जुत्यांच्या आवाजावरून सुद्धां आम्हीं आबांची चाल ओळखतो असें कांहीं जुने कुळवाडी अभिमानानें सांगत असत.

ते रस्त्यावरून चालूं लागले म्हणजे रस्त्यावरील कुळवाडी कडेला उभे रहात आणि आबा पुढें गेले कीं मग चालूं लागत. झेलपटत चाललेला दारूडा आबांची चाहूल लागली कीं त्यांच्या दृष्टीस न पडतां मागच्या मार्गें पळ काढीत असे.

वाटेंत सुद्धां आबांचें निरीक्षण चालू असायचें. रगल्या म्हाराच्या पोटाची खळगी पाहून त्यांचा हात आपोआप खिशांत जात असे आणि रगल्याच्या हातीं पावली पडत असे. भिवाच्या घरावरले नळे फुटलेले दिसले तर आपल्या घरच्या सांठ्यांतून पांचपन्नास



आबा—

उंच आणि भरदार प्रकृति. काळसर पण करारी चेहरा. बेताच्याच मिशा. नाकावर सोन्याच्या काडीचा चष्मा. दोन भुवयांमध्यें लाल गंधाची नाजुकशी टिकली, आणि कानांत मोत्याची भिकबाळी.

नळे घेऊन जा असें फर्मावून ते पुढें जात. एखाद्या डबक्यांत मरतुकडें ढोर रवंथ करीत पडलेलें दिसलें कीं ते गुराच्या मालकाला म्हणत, "मेल्या सगळां तूंच खावू नको. थोडां ढोराच्या पण पोटांक घाल.'

आबा देवळांत आले कीं तेथें क्षणांत सामसूम होई. लामनदिव्याच्या वाती सारण्यासाठीं आलेल्या भावणी कांकणांचा आवाज न होऊं देतां देवळाच्या खांबांच्या आडोश्याला उभ्या रहात. देवाचा कौल घेण्यासाठीं आलेलीं माणसें आपापसांतली बातचीत थांबवून आदरानें उभीं रहात. मग तीर्थ-अंगार घेऊन आबा बाहेरच्या चवुथऱ्यावर मांडी ठोकून बसत आणि एखादी बिडी शिलगावून आपल्या सांठवणींतले रहस्यमय अनुभव सांगूं लागत. ते ऐकण्यासाठीं पंधरावीस माणसांचा तळ हा हमखासच असायचा.

*महाराष्ट्रांचे नव्या दमाचे विनोदी लेखक श्री. जयवन्त दळवी, वाचकांच्या उंचावलेल्या अपेक्षा पूर्ण करतील असेच खुशखुशीत आणि सरस लेख या लेखमालेंतून लिहित आहेत. या मालेंतील हा चौथा लेख. मागील सर्व लेखांपेक्षां किती सरस आहे हें तो वाचल्यावरच लक्षांत येईल—*

एक प्रसंग--

हा प्रसंग कधीं कुणाला सांगितल्याशिवाय आबांना चैनच पडत नसे. गावच्या वेशीवर असलेल्या कांहीं टेकड्यांवर आमच्या कलमी आंब्यांच्या बागा होत्या. आंब्याच्या हंगामांत हीं झाडें फळांच्या भारानें अक्षरशः वांकत असत. तेथें राखणदार ठेवणें शक्य नसल्यामुळें चोरीची भीति फार. पण आबा सारा भार रवळनाथावर ठेवीत असत. त्यासाठीं नारळ, केळीं, कोंबडी रवळनाथाच्या पुढें ठेवून ते गाऱ्हाणें घालत आणि मग अरुरुवा गांवाला सांगत सुटत कीं माझे आंबे कोणी चोरले तर त्याला रवळनाथ सुटा सोडणार नाहीं. रवळनाथाच्या भीतीनें खरोखरच त्या बागेंत पाय ठेवायला लोक कचरत असत. तरीहि धीर करून एके दुपारीं तुक्या बागेंत शिरला. एका झाडावर चढून त्यानें दहापंधरा आंबे तोडले मात्र—आणि एकदम कुणी तरी ढकलून दिल्यासारखें त्याला वाटलें आणि तोल जाऊन तो एकदम खालीं खडकावर पडला. खालीं पडतांच कुणीतरी ढकललें असें ओरडत त्यानें प्राण सोडला. ती बातमी वाऱ्यासारखी गांवभर पसरली आणि रवळनाथानेंच तुक्याला ढकललें अशी सर्वांची खात्री झाली.

दुसरा प्रसंग—

लग्न होऊन बरींच वर्षें झालीं तरी पोरबाळ नाहीं म्हणून दादू चिन्तेंत होता. वंश कसा वाढेल या विचारानें तो खंगत होता. त्यानें अनेक नवस करून पाहिले आणि शेवटीं आबांच्या चरणावर डोकें ठेवलें. आबांनीं रवळनाथाला गाऱ्हाणें घातलें आणि नेमानें देवळाकडचा एक भाग झाडत जा म्हणजे पोर होईल असें सांगितलें. दादूचा नेम सुरू झाला आणि गंमत अशी कीं वर्षभराच्या आंतच दादूला पोरगा झाला. बारश्या दिवशीं









अनुक्रमणिका

ट दूनं पं गला आबांच्या पायावर ठेवलें आणि आनन्दानें अश्रु ढाळले.

तिसरा प्रसंग तर अधिक गंमतीचा—

भाताचा तरवा जोमानें वाढत होता आणि नेमकी सगळ्या शेतांत कीड पडली. तरवा मरणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. सर्वांचीं रोंडें सुकीं पडलीं. नव्वदी गाठलेले म्हातारे असा प्रसंग उभ्या हयातींत पूर्वी कधीं पाहिला नाहीं असें सांगूं लागले. शेवटीं आबांना स्वस्थ बसवलें नाहीं. एके दिवशीं ते स्वतः बाहेर पडले. मळ्यावर गेले. सायंकाळची वेळ. त्यांनीं शेंकडों कुळवाडी जमवले. केळीच्या पानावर भात वाढून आणला. वर गुलाल टाकला. टांचणी टोंचून लिंबू ठेवलें. पेटवलेला काकडा भातांत रोवला आणि एक नारळ दगडावर आपटून फोडला. त्यावेळीं साऱ्या परिसरांत शान्तता होती. त्या शान्ततेचा भंग करून आबा ओरडले, ' हात जाऊं ! ' सारे कुळवाडी हात जोडून उभे राहिले. मग ' महाराजा रवळनाथा...' अशी आरोळी ठोकून आबांनीं रवळनाथाला गाऱ्हाणें घातलें आणि ते डोळे मिटून उभे राहिले. शान्तता पसरली. अगदी स्मशानासारखी. वारा पडल्यामुळें झाडांची सुद्धां सळसळ नव्हती.

तेवढ्यांत कुठल्याशा पांखराचा चित्कार ऐकूं आला. आबांनीं डोळे उघडले आणि आकाशाकडे पाहिलें. काळोख पडला होता. चार चुकलीं माकलीं पाखरें तेवढीं परत धांव घेत होतीं.

आतां काय चमत्कार होणार तें पहाण्यासाठीं शेतकरी उत्सुक होते. सारी रात्र जवळ जवळ त्यानीं जागून काढली आणि चमत्कार काय ! दुसरे दिवशीं पांखरांचे थवेच्या थवे गांवावर चाल करून आले. लोकांनी झाडांच्या आडून, डोंगरावरून पांखरें काय करतात तें पाहिलें आणि गंमत अशी कीं सारी कीड त्या पाखरांनीं टिपून खाल्ली आणि सांज होतांच उडून गेली. सारे जण निर्धास्त झाले. त्यानीं आबांना दुवा दिला.

प्रसंग चौथा–पांचवा–सहावा !

बैठकच रंगायला हवी. असल्या कितीतरी भाविक गोष्टी ते एकामागून एक बाहेर काढीत. असल्या किती तरी प्रसंगांची त्यानीं आपल्या अंतःकरणाच्या गाभाऱ्यांत गोठवण करून ठेवली होती. या गोष्टी पुनः पुनः सर्वांना घोळवून सांगण्यांत आबांना मोठी धन्यता वाटे. त्या गोष्टी सांगतांना ते तन्मय होऊन जात.



बराच अंधार झाल्यावर पेस्तॉनच्या गुत्यांतून बाबल्या आणि मुंगी हवालदार एकमेकांचा आधार घेत बाहेर पडले, झेलपाटे खात चालूं लागले तोंच दगडाला आपटून मुंगी खालीं पडला. बाबल्या झिंगत पुढें गेला. टॉर्चच्या प्रकाशांत पाहिलें तों थुंकीच्या फेसानें त्याचें तोंड बरबटलें होतें. धडधडत्या काळजानें मी त्याच्या छातीवरचा बिल्ला आणि कमरेचा पट्टा काढून घेतला आणि जीव घेऊन पळालों तो थेट घरीं—

आणि या साऱ्या प्रसंगांचें तात्पर्य एकच-रवळनाथाची कृपा ! रवळनाथावर त्यांची विलक्षण श्रद्धा होती. ते कधीं औषधपाणीसुद्धां घेत नसत. थोडा अंगारा जिभेवर ठेवून वर तीर्थ पीत असत आणि दुसरे दिवशीं प्रकृति टणटणीत झाल्याचें जाहीर करीत असत. मला आठवतें, एकदां रात्रीं तीन वाजतां त्यानीं मला उठवलें आणि म्हणाले, 'कंदील घेऊन माझ्याबरोबर चल !'

कारण रवळनाथाच्या देवळांतला लामणदिवा विझला होता.

मी डोळे चोळीत फक्त त्यांच्याकडे पहात राहिलों. त्यांतलें अवाक्षर सुद्धां मला कळलें नाहीं. रवळनाथाच्या समोरचा लामणदिवा विझला हें त्यांना भलत्या वेळीं सांगितलें कुणी ? एवढाच एक प्रश्न माझ्या मनांत होता.

पण रवळनाथ त्यांच्या स्वप्नांत आला होता. येऊन दिवा पेटवून जा असें त्यानें सांगितलें होतें.

आम्ही दोघेहि लगबगा देवळांत गेलों.

आणि पहातो तो खरोखरच रवळनाथाच्या पुढ्यांत किच्च अंधार होता. सारे दिवे विझले होते. सर्व दिव्यांच्या वाती पेटवून आम्ही घरीं आलों. त्यानंतर किती तरी वर्षें हा प्रसंग ते गांवभर सांगत असत. तो प्रसंग सांगतांना त्यांना हर्ष व्हायचा. त्या दृष्टांतामुळें आपलें जीवनच उजळून गेल्यासारखें त्यांना वाटायचें.

असें आबांचें जीवन होतें.

सर्वांनीं प्रामाणिकपणानें रहावें. रवळनाथावर श्रद्धा ठेवावी. आपल्या घराण्यावर कुळवाड्यांनी निष्ठेनें प्रेम करावें. दारू प्यायचीच असली तर ती बेतानें प्यावी, असें आबांना मनापासून वाटे. गांवांतली माणसें सुखी असावीत, आनंदी असावीत. कुणी संकटांत असला तर त्यानें आपल्याकडे यावें. मन मोकळें करावें अशी त्यांची इच्छा असे. त्यासाठीं वर्षांतून एकदां उन्हाळ्यांत आमच्या घरीं सामुदायिक कार्यक्रम असत. गांवांतल्या पंचवीस–तीस बायका येऊन पत्रावळी आणि द्रोण लावीत बसत. त्यानंतर पापड घालण्याचा मोठा कार्यक्रम असे. दुसऱ्या पंचवीस–तीस बायका येत आणि हजार दीड हजार पापड घालीत. दुसऱ्या आवाठांतल्या बायका येत आणि चारपांचशें आंब्यांचें लोणचें घालीत. प्रत्येकीला परत जातांना पापड मिळत, लोणचें मिळे. चांगले पंधरा वीस दांडगे झिलगे येऊन जळाऊ लांकडे फोडून झिलप्यांचा मोठा डोंगर रचून ठेवीत. हें सारें कशासाठीं ? ही जवळ जवळ गांवाचीच मालमत्ता असे. पावसाळ्यांत कुणाच्या घरीं









आजार असला कीं त्यानें आमच्या घरीं यावें. पापडांची जुडी न्यावी, द्रोणांतून लोणचें न्यावें. दुपारीं कांहीं ना कांहीं कामासाठीं येणाऱ्या कुळवाड्याच्या पुढ्यांत पत्रावळी मांडून त्यांच्या जेवणाची सोय होई. गांवांत कुणी म्हातारी मेली तर तिच्या पोरानें निर्धास्तपणें यावें आणि गाडाभर लाकडें घेऊन जावीत, अशी प्रथा होती.

अशा प्रथेमुळें आमच्या घराला गांवांत विशिष्ट स्थान होतें. कुणाच्या घरीं लग्न–कार्य असलें तर पहिला नारळ रवळनाथापुढें आणि दुसरा आबांपुढें हें ठरलेलें असें. लग्न होतांच जोडप्यानें प्रथम रवळनाथाच्या पाया पडायचें आणि तेथून तडक आमच्या घरीं येऊन आबांच्या पाया पडायचें अशी प्रथा होती. नव्या नवरीची हिरव्या खणानें प्रथम ओटी भरण्याचा कार्यक्रम आमच्या घरीं होत असे.

पण कुणी चोरी अगर दगाबाजी केली म्हणजे मात्र आबांच्या संतापाला मर्यादा रहात नसे. विशेषतः गांवांतली कांहीं माणसें आपल्याशीं बेइमानी करतात तीं बाबुली त्यांना फूस देतो म्हणून असें त्यांना मनापासून वाटे. अनेक वेळां तें खरेंहि असे. कृष्णानें असेच एकदां आमचे नारळ चोरले. 'तूं नारळ चोर आणि खा. आबा काय करतां बघूं या !' असें त्याला बाबुलीनें आश्वासन दिलें होतें. त्या भरवंशावर कृष्णालाहि चोरी करायचा धीर झाला. पण आबांनीं त्याची गय केली नाहीं. प्रथम कृष्णाची कानशिलें तर रंगवलींच आणि वर फिर्याद दाखल केली. कृष्णाला दंड झाला. पण तो भरणार कुठून ? दंड भरला नाहीं तर तुरुंग. आबा कोर्टाच्या बाहेर पडतां पडतां कृष्णानें त्यांच्या पायांवर लोटांगण घातलें आणि तो घळघळां रडला.

झालें ! त्यांचा क्षणापूर्वींचा राग पार विरला. आतां तुरुंगांत जाईल या विचारानें आबा एकदम विरघळले. दंडाचे पैसे त्यांनी स्वतःच भरले आणि त्यांनीं कृष्णाला सोडवून घेतलें.

असा विलक्षण स्वभाव होता आबांचा !

× × ×

गावांत कांहीं माणसें अशीं होतीं कीं तीं आम्हाला नेहमीं आमच्यांतलींच वाटायचीं. झिलू सोनसूरकैर, शंकर रगजी, सोनू दुलाजी, भालू चिपकर किती तरी माणसें आज नजरेसमोर उभीं रहातात. दरवर्षी गणपति यायच्या आधल्या दिवशीं झिलू स्वच्छ आंघोळ करून यायचा. गणपती पुजायच्या खोलींत झाडलोट करून जमीन सारवायचा. छताला लोंबणाऱ्या ताटीला नारळ, फुलें, फळें, बांधून ती सजवायचा. शंकर रगजी हा गांवांतला प्रख्यात कलावंत. दरवर्षी नागोबा, बाळकृष्ण आणि मग गणपति या तिन्ही देवांच्या मूर्ति करायचा आणि न चुकतां दादुल्याच्या डोक्यावरून घरीं आणून ठेवायचा. सोनू दुलाजी–देवळांतल्या साऱ्या उत्सवांत मला खांद्यावर घेऊन फिरवायचें काम त्याचें. मलाच कां ?–माझ्या वडिलांना, आबांना सुद्धां त्यानेंच खांद्यावरून देवळांतले उत्सव दाखवले होते. त्याच्या खांद्यावर बसल्यानंतर त्याच्या तासलेल्या खरबरीत डोक्याचा हाताला जो स्पर्श होई तो आजही माझ्या स्मरणांत आहे. भालू खरें म्हणजे नजरेनें बाईट होता. तो स्मृति करून देतो असें आबा कृतज्ञतेनें म्हणायचे.

एका निष्ठेनें हीं आणि इतर अनेक माणसें आमच्या घराण्याला बांधलेलीं होतीं. यांना आमच्याकडून काय मिळायचें ? उलट, आतां विचार केला म्हणजे वाटतें, जमीनदार या नात्यानें त्यांच्या श्रमावरच आम्ही जगलों, वाढलों. तरी या साऱ्या माणसांनीं आमच्यावर प्रेमाचीच खैरात केली. कशासाठीं ?—कांहीं नाहीं. कसलीहि अपेक्षा न धरतां त्यानीं फक्त निष्ठा तेवढी उरांत ठेवली. असलीं माणसें आतां कुठें आणि कधीं सांपडतील ?

दरिद्र्यांत वाढलेली आणि दरिद्र्यांतच रहाणारीं हीं माणसें अखेरपर्यंत विकलीं गेलीं नाहींत. खरें म्हणजे यांतल्या कुणीहि आमच्याशीं नुसती पाठ फिरवली असती तरी बाबुलीनें त्यांना झेलून घेतलें असतें. त्यांच्या पोटापाण्याची सोय केली असती. पण आमच्या घराण्याखातर त्यानीं बाबुलीच्या घराण्याशीं पिढ्यान् पिढ्या वैर जोपासलें होतें. झाडामाडाच्या भांडणावरून मारामारीचा प्रश्न येवो, बाबुलीविरुद्ध कोर्टांत खोटी साक्ष देण्याचा प्रश्न येवो किंवा बाबुलीचें नाक कापण्यासाठीं केशा चांभाराला निवडून देण्याचा प्रश्न येवो—हीं माणसें पुरेपूर



शांत्या न्हावी बाबुलीच्या घरीं गेला. बाबुलींची दाढी आटोपली तरी तो तिथेंच रेंगाळत राहिला. मग कांहीं वेळानें तो बाबुलीला म्हणाला, 'धनियानुं, थोडां पपनसाचां बी होयां !'
हें ऐकतांच बाबुलीचा चेहरा लालबुंद झाला. शांत्याच्या नजरेंत येण्याआधींच त्याच्या कंबरड्यांत दणकन् लाथ बसली. त्या लाथेनें शांत्या तेथून उडाला तो सरळ आमच्या घरीं—

वाः छान गुलाब फुलला आहे असें मेल्यानें म्हणावें आणि दोन दिवसांत गुलाबाचें झाडच सुकावें; काय आंबा मोहरला आहे असें त्यानें म्हणावें आणि मोहोर जळावा हें ठरलेलेंच होतें. तरीहि हा म्हातारा काठी टेकीत रोज आमच्या घरीं यायचा आणि आमच्या पूर्वजांच्या सद्वर्तनाचे पाढे वाचायचा. या भालूमुळें आमची पावलं ठीक पडतात, आमच्या घराण्याच्या पूर्वापार चालीरीतांची

आत्मविश्वासानें आबांच्या पाठीशीं हजर. बाबुलीच्या घराण्याशीं असलेलें आमचें वैर म्हणजे अतोनात कैफ चढवणारें एक मद्य होतें.

या दोन घराण्यांत हें वैर कसें आणि कधीं निर्माण झालें ? कुणालाच सांगतां येणार नाहीं. ऋषीचें कूळ आणि नदीचें मूळ शोधूं नये असें म्हणतात. बाबुलीच्या घराण्याशीं आमच्या घराण्याचा जो पिढ्यान्‌पिढ्या तंटा-बखेडा चालत आला आहे त्याबाबतहि तसेंच म्हणतां येईल. आज पोटापाण्यासाठीं मी परगांवीं येऊन राहिलों आहे. म्हणून अनेकदां मी तटस्थ मनानें विचार करतो. माझ्या मनालाच प्रश्न करतो, या दोन घराण्यांत हें वैर कां ? कशासाठीं ? पण उत्तर सांपडत नाहीं. कदाचित कधीं सांपडणारहि नाहीं. तंटा मुळांत कुठें आणि कधीं सुरू झाला याचा मलाच कां आबांनाहि पण पत्ता नव्हता. त्यासंबंधीं मी कधींच कांहीं त्यांच्या तोंडून ऐकलें नाहीं. खरें म्हणजे आबा खुद्द तंट्यांतच एवढे गुरफटलेले असत कीं त्यांना त्याच्या मुळाशीं जाण्याचा विचारच कधीं सुचला नसावा !

मला समजूं लागल्यापासून पहात होतों, आमचें घर बाबुलीच्या नांवानें आणि बाबुलीचें घर आबांच्या नावानें सारखें बोटें मोडत असे. त्यांत योग्य-अयोग्य किती होतें, इष्ट-अनिष्ट किती होतें याचा कोणीच कधीं विचार केला नाहीं. खरें सांगायचें म्हणजे मीहि गांव सोडून जाईपर्यंत या गोष्टीचा कधीं गंभीरपणें विचार केला नव्हता.

नाहीं म्हणायला मी इंटर झाल्यानंतर एकदां गांवीं गेलों होतों. त्यावेळीं धुंद करून टाकणारी एक रोमँटिक कल्पना मला सुचली होती. या दोन घराण्यांतलें जुनाट वैर एका फटक्यांत नाहींसें करावें अशी सिनेमा-नाटकांत दिसणारी कल्पना मी मनांत घोळविली होती. त्याचें असें झालें. इंटरची परीक्षा झाल्यानंतर मी मुंबईहून गांवीं गेलों होतों. त्यावेळीं माझें झालें एवढें शिक्षण खूप झालें असें समजून आबा माझ्या लग्नाच्या गोष्टी काढत होते. त्याच वेळीं बाबुलीची मुलगी मी अगदीं आकस्मिकरीत्या रवळनाथाच्या देवळांत पाहिली. विठा तिचें नांव. ती परकरी असतांना मी तिला अनेकदां पाहिली होती. पण त्या पहाण्यांत अर्थ नव्हता. प्रथमतः बाबुलीची मुलगी हें लक्षांत येतांच झटक्यानें नजर फिरवून तिसरीकडेच पहायची मला संवय लागलेली होती. त्यामुळें बाबुलीची विठा इतकी देखणी असेल याची मला कल्पनासुद्धां नव्हती. पण तिला रवळनाथाच्या देवळांत पाहिली तेव्हां तर अक्षरशः थक्क होऊन गेलो. वयांत येतांच ती रूपानं आणि अंगाबांध्यानें इतकी सुंदर दिसेल अशी मला कल्पनाहि नव्हती. ती नजरेंत येतांच, कांहीं काळ कां होईना, पण मी आमच्या दोन घराण्यांतलें वैर तात्काळ विसरलों. तिला मागणी घालावी असा धुंद विचार लाडिकपणानें मनाला छळूं लागला. हा विचार चालू असतांनाच, तिच्याशीं लग्न करून मी सुखांत आहे, बाबुली आमच्या घरीं येऊन जेवण झोडतो आहे, आबा बाबुलीच्या पंक्तीस बसून मटण-वडे झोडताहेत अशीं रम्य वाटणारीं स्वप्नाळू चित्रें मी मनःचक्षूंसमोर खेळवीत होतो. इतकेंच काय, विठा हें तिचें जुनाट, गांवढळ आणि अरसिक नांव बदलून स्नेहप्रभा असें तिचें नांव ठेवण्याचेंहि मी पक्कें केलें होतें.

पण बाबुलीकडे प्रत्यक्ष जाऊन मागणी घालणें मला शक्य नव्हतें. त्याच्या घरीं जाणें मला कसेसेंच वाटत होतें. शिवाय आबांनाहि तें आवडलें नसतें. आणि एवढेंहि करून गेलों तर असतों तरी मागणीचें बोलणें मला करतां आलें नसतें. स्वतःच्या लग्नाच्या गोष्टी मुलीच्या बापाकडे जाऊन स्वतःच करणें ही मोठी कठीण गोष्ट असते. मला तरी त्यावेळीं तो तशी कठीण वाटली एवढें निश्चित !

म्हणून मी बाबुलीला एक अगदीं खाजगी स्वरूपाचें पत्र लिहिलें. त्या पत्रांतला संपूर्ण मजकूर आज मला आठवत नाहीं, परंतु या दोन घराण्यांतलें चालू असलेलें वैर आतां संपुष्टांत आलें पाहिजे. आपण शेजारी आहोंत. सध्या जें आपलें संबंध आहेत ते कांहीं शेजारधर्माचे नव्हेत. विठाच्या आणि माझ्या विवाहानें ऋणानुबंध जुळून यावेत अशा प्रकारची आशा पत्रांत मी व्यक्त केली होती. पण खरें सांगतो, या पत्राखालीं माझी सही करण्याचें धाडस मात्र मला झालें नाहीं. कुणी तरी एक तिऱ्हाईत बाबुलीला हें पत्राद्वारें सुचवतो आहे अशा धाटणींत मी तें पत्र लिहिलें आणि खालीं 'आपल्या घराण्याचा हितचिंतक' एवढेंच लिहून पत्र पोस्टांत टाकलें.

तिसऱ्या दिवशींच पोस्टानें मला लखोटाबंद पत्र आलें. बाबुलीला मी जें पत्र लिहिलें होतें त्यांतला मजकूर मला आज आठवत नाहीं. परंतु बाबुलीनें पाठविलेल्या पत्रांतल्या ओळी मात्र मला अजूनहि स्पष्ट आठवतात. अक्षर नि अक्षर आठवतें. इतकेंच नव्हे तर बाबुलीनें आपल्या करड्या भसाड्या आवाजांत त्या चार ओळी माझ्या कानावर आदळल्याचा मला आजहि भास होतो.

'खबरदार पुनः असलीं फाजील पत्रें लिहिशील तर. तुला माझी पोर देण्याऐवजीं मणाचा धोंडा तिच्या गळ्याला बांधून तिला तळ्यांत बुडवीन. याद राखून ठेव. तिच्यावर डोळा ठेवशील तर. मुडदा पाडीन. बाकी तुझा मुडदा पाडून त्याचें करायचें काय ? तुझा मुडदा खतासाठी माडाच्या मुळांत पुरला तर माझे माड तेवढें मरतील–बाबुली.'

बस्स ! एवढेंच पत्र. हितचिंतकाच्या नांवानें लिहिलें तरी तें मीच लिहिलें असें बाबुलीला खात्रीपूर्वक वाटलें. त्याला शंकासुद्धां आली नाहीं. मुलगी नाहींच. उलट माझा मुडदाच पाडण्याची तयारी आणि माझा मुडदा खतासाठींसुद्धां उपयोगी पडणार नाहीं याची बालंबाल खात्री. केवढा विखारी द्वेष ! पण मी तें सारें सहन केलें. गप्प बसलों आणि महिन्याभरांत मुंबईस गेलों. झालें गेलें विसरून जाण्याचा प्रयत्न केला. माझ्या पत्राची आणि बाबुलीच्या उत्तराची वाच्यता कुणापाशीं केली नाहीं. उलट बाबुलीच याचें मोठें प्रकरण करील कीं काय या चिंतेनें तेवढा आणखी जळलो. पण तसें कांहीं झालें नाहीं. जर कां हें पत्र मी आबांना दाखवलें असतें तर !–तर काय घडलें असतें याची मला कल्पनाहि करवत नाहीं. पहिल्या प्रथम बाबुलीची विठा माझ्या मनांत भरावी याच गोष्टीचा त्यानीं कडक शब्दांत धिक्कार केला असता. माझी निर्भत्सना केली असती. त्याहि पुढें जाऊन मी बाबुलीला पत्र लिहिलें आणि विठाला मागणी घातली हें पाहून तर त्यांनीं माझीं कानशिलेंच रंगवलीं असतीं. पण त्याचबरोबर माझा अपमान करणारें बाबुलीचें पत्र त्यांना नवीन आव्हान देणारें वाटलें असतें. कदाचित एक पाऊल पुढें जाऊन मिशावर मूठ. ओढत ते म्हणाले असते, 'विठाची संमति असेल तर आण तिला पळवून. भडवा बाबुली काय करतो तें पहाजों ! '

पुढल्या साऱ्या परिणामांकडे पाहून मी आवंढा गिळला. आव्हान–प्रति–आव्हानांत, शिवीगाळींत आणि कोर्ट खटल्यांत बिचाऱ्या विठाचा बळी नको अशा विचारानें मी गप्प बसलों. आतां वाटतें, त्यावेळीं मी केलें तें योग्य केलें, दाखवला तो समंजसपणा होता.

अशा चमत्कारिक द्वेषाच्या फेऱ्यांत त्यावेळीं आम्हीं सांपडलों होतों. खुद्द माझ्या जन्माच्या वेळीं सुद्धां हेच फेरे प्रबळ होते. विठाची वरची बहीण वत्सला आणि मी यांचा एकाच दिवशींचा जन्म. माझ्या आईला मुलगी व्हावी म्हणून बाबुलीनें नवस केले होते आणि बाबुलीच्या बायकोला मुलगी व्हावी म्हणून आबांनीं नवस केले होते. एकाच देवापाशीं दोन घराण्यांनीं परस्पर विरोधी नवस करून खुद्द देवालाहि पक्षकार करून घेतलें होतें. अखेर आंबांच्या सुदैवानें आणि बाबुलीच्या दुर्दैवानें आबांना मी झालों आणि बाबुलीला मुलगी झाली. तेव्हां आबांनीं बाबुलीच्या कानठळ्या बसतील एवढ्या फटाक्यांच्या माळा लावल्या होत्या म्हणे ! आणि पुनः वर "मुलगा होईल या आशेनें आणून ठेवलेले फटाके सांगशील त्या किंमतीला विकत घेईन !" असा दुखरा निरोप बाबुलीच्या कानापर्यंत पोहोंचता करायला आबानीं मागेंपुढें पाहिलें नव्हतें.

माझ्याच जन्माच्या वेळीं बाबुलीला आणखी एक दणका बसला होता. माझा जन्म झाला आणि आबा व बाबुली यांच्यांतला दोन माडांचा एक जुनाट खटला आबांच्या बाजूनें झाला. आमचा विजय झाला.

या दोन माडांचा खटला आमच्या गांवातच काय पण तालुक्यांत आणि जिल्ह्यांतहि ख्याति पावलेला होता. लोक म्हणत, माड ते कसले !–आणि त्यांतहि पुनः सारा वाद दोन माडांचा ! पण आबा आणि बाबुली यांचा त्यावेळीं समंजसपणाचा एक शब्दहि ऐकूं येत नसे. आमच्या आणि बाबुलीच्या जमिनीचे दोन तुकडे एकेठिकाणीं एकमेकांना बिलगून होते. दोन कुणगे जिथें एकमेकांना बिलगले होते तिथें एक मेर होती आणि बरोबर त्या मेरेवर माडांची दोन झाडें होतीं. ते माड कुणाचे असा वाद निर्माण झाला. भांडणें नकोत, पैशाचा अपव्यय नको म्हणून एक माड आबांनीं घ्यावा आणि दुसरा बाबुलीनें घ्यावा आणि त्याप्रमाणें ती मेर नागमोडी करून टाकावी असें कांहीं समंजस लोकांनीं सुचविलें पण त्या दोघांनांहि तें पटलें नाही.

दोघांनीहि कमरा कसल्या. माडावरले नारळ पाडायची पाळी आली म्हणजे तर शिवीगाळ आणि मारामारी यांना अक्षरशः ऊत येई. दोन्ही पक्षाचे कुळवाडी त्या माडांच्या मुळाशीं एकमेकांना बडवीत असत. पुढें पुढें तर माडांचा वाद किरकोळ ठरला आणि त्यानिमित्तानें झालेल्या मारामारीचे खटले प्रमुख ठरले.

एकदां तर म्हणे कहरच झाला होता. बाबुली नारळ काढण्यासाठीं चार झिलगे घेऊन आला आणि एका माडावर एकामागून एक चार झिलगे वर चढले. एवढ्यासाठीं कीं नारळ खाली पडल्याचा आवाज येतांच आबा तिथें हजर होतील आणि मग दमदाटी करतांच सर्वांत वरचा कुळवाडी कदाचित् घाबरून उतरण्याचा प्रयत्न करील. म्हणून त्याला धीर देण्यासाठीं आणखी तीन कुळवाडी त्यानीं एकामागोमाग एक असे वर चढवले. पहिला नारळ पडण्याआधींच आबा तिथें हजर



अनुक्रमणिका

झाले. आवाज दणदणून सोडणाऱ्या आपल्यां आवाजानें त्यानीं सर्वांचा उद्धार केला आणि माडावर चढलेल्या झिलग्यांना ताबडतोब खाली उतरण्याची ताकीद दिली. पण मेरेच्या पलिकडे बाबुली हातांत काठी घेऊन उभा होता. तो आरडाओरडा करून झिलग्याना धीर देत होता. या झटापटींत वरच्या एका झिलग्यानें एक नारळ खालीं टाकला. नारळ खालीं पडतांच आपल्या मस्तकीचा तुराच तुटून खालीं पडावा तसें आबांना वाटलें. त्यांनीं तत्काळ कुऱ्हाड आणवली आणि ती हातीं घेऊन स्वतः माडाच्या मुळावर फटाफट घाव घालायला सुरवात केली. त्याबरोबर झटपट मात्रा लागू पडली. टिचकी मारतांच मुंग्या खालीं पडाव्यात तशा त्या झिलग्यांनीं झपाझप खालीं उड्या टाकल्या. पण खाली पडलेल्या एकुलत्या एका नारळासाठीं ज्या मारामाऱ्या झाल्या त्या थेट पुढें वरिष्ठ कोर्टापर्यंत गेल्या.

जमीन मापण्यासाठीं आणि माड पहाण्यासाटीं सरकारी अंमलदार येत. खरे खोटे साक्षीदार दोन्ही बाजूनीं उभे रहात. म्हानू कांबळी, झिलू सोनसूरकर, शंकर रगजी, सोनू दुलाजी, भालू चिपकर वगैरे कांहीं ठराविक माणसें कोणत्याहि खटल्यांत आमच्या वतीनें विश्वासू साक्षीदार म्हणून उभे रहात. या अंमलदारांना आपल्या घरीं नेऊन त्यांना जेवणें देण्यासाठीं उभय पक्षांची मोठी धडपड चाले. एखादा अंमलदार आमच्या घरीं आला कीं बाबुली पक्षपाताची तक्रार थेट वरिष्टांपर्यंत नेई, आणि दुसरा एखादा अधिकारी बाबुलीकडे गेला म्हणजे आबा वरिष्ठांचे कान फुंकीत.

असें करतां करतां या दोन माडांपायीं कोर्ट-कचेऱ्या म्हणजे आबा-बाबुलीची माहेरघरें बनलीं. वादी, प्रतिवादी, कैफियत, फैसला या शब्दांचा दोन्ही घरांत जप होऊं लागला आणि ते शब्द उच्चारतांच दोघांनाहि अवसान चढूं लागलें.

शेवटीं दीर्घ कालानंतर निकाल लागला तो आबांच्या बाजूनें. दोन्ही माड आबांस मिळाले. निकालाप्रमाणें ते आबाना मिळाले खरे. पण ते माड आबांना लाभले नाहींत. कोर्टांत खटला चालू होता तेव्हांपासूनच ते दोन्हीं माड सुकूं लागले होते. खटल्याच्या निकालानंतर आबांनीं प्रेमभरानें आपल्या माडांकडे पाहिलें मात्र-त्यांच्या डोळ्यांत क्वचित् दिसणारे अश्रू पापण्यांमध्यें एकदम झिगझिगले. चष्म्याच्या खालून उपरण्याचें टोंक घालून त्यानीं आपले डोळे टिपले—दोन्ही माडांची चुडतें गळून पडलीं होती. आणि सुकून ताठ झालेले शेंडे सोट उभे होते.

'झाडांमाडांचा ह्यां असांच. न्यायनिवाडो केलो म्हंजी जगाचीच नाय तीं!' नव्वदी उलटलेल्या एका वृद्ध कुळवाड्यानें आपला सनातनी सिद्धान्त आबांच्या कानीं घातला होता पण आबांना तो पटला नसावा.

त्यांनीं ते मेलेले माड तसेच उभे राहूं दिले.

पण पुनः बाबुलीनें आपली नांगी वरच केली. ज्याला त्याला तो तिथें घेऊन यायचा आणि म्हणायचा, 'बघा-बघा. भडव्यान् कोर्टांत जाऊन काय मिळयलां तां! दोन मेलेले माड! तोडून कर म्हणूचा वासे!'



बाबुलीचे हे शब्द आबांच्या कानीं येतांच आबांचें मस्तक पुनः एकदा तापलें. त्यानीं ताबडतोब दोन कुळवाडी बोलावले आणि हुकूम सोडला, 'तोडा-तोडून टाका हे माड. वासे फुकट गेले तरी बेहत्तर! पण दोन्ही माड बाबुलीच्या जमनींत पडूक होये. किमान दोन तरी आंब्यांचीं कलमा माडांखालीं मोडून पडूक होयी. पांच पांच रुपये दितलंय!'

झालें! अवघ्या अर्ध्या तासाच्या अवधींत आबांचे दोन माड बाबुलीचीं दोन कलमें जमीनदोस्त करून आडवे झाले.

त्यासाटीं पुनः नवीन खटला सुरू झाला. त्यांतून आणखी किती खटले उद्भवले आणि त्यांचे निकाल कधीं लागले हें मलाहि आतां फारसें स्मरत नाहीं.

अर्थात खटले नसले म्हणजे हे दोन महान् पुरुष स्वस्त बसले असें कधींच घडलें नाहीं. जुन्या फिर्यादीची तारीख फार पुढें पडलेली असली म्हणजे त्या काळांत म्हणा अगर एका फिर्यादीचा निकाल लागून दुसरी फिर्याद गुदरण्यापर्यंतच्या काळांत म्हणा, आबा आणि बाबुली कधीं स्वस्थ बसलेले मला स्मरत नाहीं.

एकमेकांच्या गोटांतल्या लोकांनाहि त्याची वारंवार झळ लागत असे. जे शहाणपणानें मूळपासून तटस्थ रहात असत ते सहीसलामत असत. या किंवा त्या गोटांत जाणाऱ्यांना विरुद्ध पक्षाकडून सतत त्रास होई.

याबाबतींत मुंगी हवालदाराची गोष्ट मला ठळकपणें आठवते.

चावडीवरचा हवालदार साटम आमच्या पक्षांत होता. त्यामुळें बाबुली त्याच्यावर टपून होता. बाबुलीनें एकदां त्याला लांच खाण्याच्या प्रकरणांत पकडून दिला आणि त्याची उचलबांगडी झाली. त्याच्या जागीं मुंगी नांवाचा हवालदार बदलून आला. तो चावडीवर आला आहे हें कळण्याआधींच आणि त्याच्या घरीं नारळ, फणस पोचवून त्याला आमच्या गोटांत ओढण्याआधींच तो बाबुलीच्या बैठकींत असतो असें कळलें आणि आबांना जबरदस्त धक्का बसला.

त्यामागोमाग आठवड्याच्या अवधींतच आबांना आखी एक धक्का बसला. तो असा—एकदां मी सायकलवरून बाजारांत चाललों होतों. नव्यानेंच सायकल शिकलों होतों. शिवाय पेडललाहि पाय नीटसे पोंचत नव्हते! बाजारांतल्या तिठ्यापाशीं माझी सायकल आली मात्र आणि डोक्यावरून पटकूर घेतलेला एक म्हातारा बोलावून आणल्यासारखा सायकलीला आडवा आला आणि इतक्या झपाट्यानें आडवा आला कीं सायकलीला ब्रेक लावायची व्यवस्था आहे हें सुद्धां मी विसरलों आणि दुसऱ्याच क्षणांत तो म्हातारा आडवा झाला. त्याच्यावर मी उताणा पडलों आणि माझ्या पोटावर सायकल पडली.

त्या म्हाताऱ्याची कांहीं तक्रार नव्हती. आपण सायकलीला आडवा आलों ही आपलीच चूक झाली असें मानून तो माझ्याच हातापाया पडूं लागला. त्यावर ताण म्हणून त्याला रोजच्या सरावांतल्या दोन शिव्या हांसडून मी पुढें जाण्याच्या बेतांत होतों,




अनुक्रमणिका

तेवढ्यांत हवालदार मुंगी धांवत पुढें आला. तो साला बाजूला कुठें होता तें मी पाहिलेंच नव्हतें. त्यानें पोलिसी खाक्यांत माझें मनगट पकडलें आणि चावडीवर घेऊन गेला. तेवढ्यांत बाजारांतले चार लोक जमा झाले. 'हवालदारसाहेब, जाऊं द्या. आबांचा मुलगा तो–' असें ते समजावूं लागले. पण मुंगी ताठ्यांत होता. तो म्हणाला, 'मी आबा–बाबा ओळखीत नाहीं. ॲक्सिडेंट झाला आहे. सोडणार नाहीं.' तेवढ्यांत त्यानें मला कोठडींतहि अडकवलें. तें कळतांच बाजारांतलीं प्रतिष्ठित माणसें चावडीवर आलीं. रदबदली सुरू झाली आणि त्यावरहि ताण म्हणजे मी आबांचा मुलगा आहे हें कळतांच तो म्हाताराच उलटा फिरला. अपघात झालाच नाहीं. सायकल आपटलीच नाहीं असें तो निग्रहानें सांगूं लागला. तेव्हां माझ्या-वर केवळ दया दाखवतो आहे अशा अविर्भावांत त्यानें माझी मुक्तता केली. पोलीस कोठडींत जाण्याचा माझा हा पहिला आणि शेवटचा प्रसंग !

घरीं येतांच भरपूर मीठमसाला लावून सारा वृत्तांत मी आबांच्या कानीं घातला. त्यावेळीं, अर्थातच, ते कांहीं बोलले नाहींत. उलट चालवतां येत नाहीं तर सायकल चालवावी कशाला असें म्हणून त्यांनीं मलाच दोष दिला. पण त्यांच्या डोक्यांत मात्र तोच विषय होता. कारण अनेकांकडे त्यांनीं मुंगीबद्दल मुद्दाम चौकशी केली होती आणि या मुंगीला देतो एकदां गुळाचा खडा खायला अशी प्रतिज्ञा केली होती. कारण मुंगी हा दारू पाण्यासारखी पितो असें त्यांना कळलें होतें.

त्यांनीं बाबल्या मडवळाला बोलावून आणलें. बाबल्या हा दारूवर जगणारा माणूस. अन्नाची त्याला वासना नव्हती. तो दारूवर आणि दारूसाठीं जगायचा. चोवीस तास दारूच्या नशेंत रहातां यावें ही त्याची इच्छा. पैशाच्या अभावामुळें त्याला तें फारसें जमत नसे. शिवाय दारू अंगावर तोलणारा इसम. कितीहि प्याला तरी आडवा लोळणारा नव्हता. फार फार तर लडबडत झिंगायचा त्याला बोलावून आबांनीं त्याच्यापुढें खणखणीत पांच बंदे रुपये वाजवले आणि सांगितले, मुंगीला भरपूर पाज आणि तूंहि पी. मुंगी लोळला पाहिजे. म्हणजे तुला पुन: उद्यां दारू—



## तनमन अमृत बनतें ऽ ग

अमृतमय मी ! अमृतमय तूं ! तनमन अमृत बनतें ऽ ग
अमृतमय श्वासांत आपुल्या अमृतनभ थरथरतें ऽ ग
अमृतमय मौनांतच..रिमझिम.. रिमझिमती अमृतधारा
भिजतें माझें अंगअंग पण...अंग तुझेंही भिजतें ऽ ग
रुधिरांतिल कल्लोळ हावरा रुधिरांतच फिरला...विरला..
एकच इवलें कातर स्पंदन अंतरांत किलबिलतें ऽ ग
आत्म्याच्या चांदण्यांत अपुल्या हुरहुरत्या हांका घुमती...
जन्माच्या वेलीचें सावध पानपान सळसळतें ऽ ग
कायेचा कापूर वंद पण... दरवळ बघ तरळत उठला:
स्पर्शाविण स्पर्शाचें वादळ धमन्यांतुन भिरभिरतें ऽ ग
प्राणाच्याही पार...आपुल्या कुठेतरी भेटी घडती...
गडे मला हें जाणवतें अन् तुजला देखिल कळतें ऽ ग
स्वप्नफुलांनी आज शिगोशिग डोळ्यांची परडी भरली !
तुझी नव्हाळी–माझी तगमग; कोण कुणाला खुडतें ऽ ग

—सुरेश भट

पांच रुपये उचलून बाबल्या निघून गेला.

सायंकाळीं काळोख पडल्यावर हातांत टॉर्च घेऊन मी पेस्तॉनच्या गुत्त्याभोंवती चोरासारखा घिरट्या घालूं लागलों. बराच अंधार झाल्यावर बाबल्या आणि मुंगी एकमेकांचा आधार घेत बाहेर पडले. झोलपाटे खात चालू लागले. कांहीं अंतर चाललें. मुंगीपेक्षां मडव्यानेंच अधिक दारू खपवली कीं काय असा संशय येतो न येतो तोच वडाच्या झाडाखालीं एका दगडाला आपटून मुंगी खाली कोसळला आणि जसा कांहीं मुंगी आपल्या घरींच गेला असें समजून बाबल्या झिंगत झिंगत पुढें गेला. टॉर्चचा प्रकाश तोंडावर टाकून मी मुंगीच्या अवस्थेचा अंदाज घेतला. थुंकीच्या फेसानें त्याचें सारें तोंड बरबटलें होतें. डोळे उघडायचें त्राण राहिलें नव्हतें. दबलेल्या आवाजांत दोन शिव्या देत मी त्याला पायानेंच हालवून पाहिला. मेलेल्या डुकरासारखा तो धुळींत पडला होता. त्याला कसलीच जाग नव्हती. धडधडत्या काळजानें मी मुंगीच्या छातीवरचा बिल्ला काढला आणि पितळी बकलाचा पट्टा सोडवून घेतला आणि जीव घेऊन तेथून पळालों तों घरीं आलों.

पट्टा आणि बिल्ला घेऊन दुसरे दिवशीं आबा तालुक्याच्या ठिकाणीं गेले आणि तो माल त्यांनीं वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांच्या हवालीं केला. मुंगी दारू पिऊन अस्ताव्यस्त पडला होता आणि बिल्ला व पट्टा त्यानें फेंकून दिला होता असेंहि त्यांनीं वरिष्ठांच्या कानीं घातलें.

पहांटे अर्धवट शुद्धीवर आल्यावर मुंगीनें आपली छाती आणि कंबर चांचपली आणि गोरामोरा होऊन तो बिल्ला आणि पट्टा शोधूं लागला. या शोधाशोधींत कसाबसा दिवस गेला. दुसऱ्या दिवशीं कोतवालाची स्वारी हजर झाली आणि मुंगीला परत घेऊन गेली. त्यानंतर तो नऊ महिने बिनपगारी सस्पेंड झाला होता. पण या साऱ्या प्रकरणांत आपणहि भागीदार होतो हे बिचाऱ्या बाबल्या मडवळाला कधीच कळलें नाहीं. उलट मुंगीला लोळवल्याबद्दल बक्षीस म्हणून तो आणखी दोन चार दिवस झिंगत होता.

आबा आणि बाबुली यांच्या वादावादींत अनेकजण असे बळी पडत असत. पण हें कांहींच नाहीं. त्या दोघांना तणातणी चालू ठेवण्यास कसलेंहि कारण पुरत असे. एखादें न दिसणारें कुसळ सांपडलें तरी पुरे. त्याचें मुसळ व्हायला वेळ लागत नसे.

अशांतलें एक कुसळ आज मला आठवतें. कशामुळें कोण जाणे. कदाचित चिंतेमुळें असेल. आबांचे केस एकाएकी पिकूं लागले होते. आबांनीं आपल्या स्वभावाप्रमाणें एरव्ही





पिक्या केसांची फारशी दखल घेतली नसती. परंतु, आबांचे पिकलेले केस बाबुलीनें कुठून दुरून पाहिले कोण जाणे. माझा असा कयास आहे, बाबुलीनें आबांचे पिकलेले केंस पाहिलेहि नव्हते. कारण दूरवर पाहूनच एकमेकांना टाळण्यांत दोघांचा जन्म गेलेला. त्यामुळें नुकतेच पिकूं लागलेले आबांचे केस बाबुलीच्या दृष्टिपथांत येण्याची शक्यता नव्हती. पण ती बातमी शान्त्या न्हाव्यानें बाबुलीला दिली होती असेंच म्हटलें पाहिजे. कारण शान्त्या हा दोघांचाहि फॅमिली न्हावी होता. आमच्याकडे स्वयंपाकासाठीं राहिलेली भटीण आणि बाबुलीची म्हातारी आई या दोघी सोवळ्या होत्या. त्यांच्यापासून ते थेट आम्हां लहानांपर्यंत सर्वांच्या हजामती शान्त्याच्या एकमेव वस्तऱ्यानें व्हायच्या. सोंवळ्या बायांसाठीं निराळा वस्तरा ठेवतो असें फक्त सांगायचा. पण खुद्द हडपामध्यें एकच वस्तरा असायचा. आबांची आणि बाबुलीची हजामत करतांना तो अनेकदां वस्तरा लावायचा. पण ते दोन्ही तापट पुरुष त्या न्हाव्याला मात्र दयाबुद्धीनें वागवीत असत. एकमेकांची गुप्त माहिती या न्हाव्यामार्फत मिळत होती म्हणून असेल कदाचित! हजामतीच्यावेळीं शान्त्याच्या तोंडापाशी आबा--बाबुलीचे कान अक्षरशः चिकटलेले असत. तो सांगतो तें ऐकण्यासाठीं उत्सुक असत. शान्त्या सुद्धां इतका वस्ताद कीं कांहीं विचारायची सोय नव्हती. दोघांच्याहि हनुवटीला हात लावण्याचें अजब तंत्र त्यानें सफाईदारपणें हस्तगत केलें होतें. आबांच्या दाढीला पाणी चोळतांच तो बाबुलीच्या गोष्टी अशा कांहीं खुलवून सांगायचा कीं आबांना वाटायचें हा आपल्याच गोटांतला इसम आहे. बाबुलीची हनुवटी घोटतांना आबांच्या गोष्टी असा ढवळायचा कीं बाबुलीला सुद्धां हा आपलाच माणूस आहे असें वाटायचें. रामायणाच्या मुळाशीं जसा धोबी तसा आबा–बाबुलीच्या बऱ्याचशा तंट्यामागें हा न्हावी होता.

याच न्हाव्याकडून आबांचे केस पिकत आहेत ही बातमी बाबुलीला कळली. वास्तविक केस पिकले यांत विशेष काय होतें! कितीतरी लोकांचे अकालीन अथवा वयपरत्वें केस पिकतात. पण आबांचे केस पिकले या गोष्टीचें बाबुलीला महत्व वाटलें. त्यांच्या पिकल्या केसाची तो जाहीर टिंगल करूं लागला. माझ्याशीं लढतां लढतां आबा म्हातारा झाला...त्याचे केस पिकूं लागले... आतां गांवांत सावरीच्या कापसाला तोटा नाही...सावरीच्या कापसाच्या उशा हव्या असतील तर आबांना भेटा...वगैरे अनेक लंब्याचवड्या गप्पा बाबुली रवळनाथाच्या देवळांत घोळवूं लागला. इतकेंच काय, पण सावरीच्या कापसाचा दर मणाचा भाव काय अशी चौकशी करणारीं कार्डेंहि तो आबांना पाठवूं लागला.

हें सारें बाबुली करीत होता म्हणूनच केवळ आबांनीं आपल्या पिकल्या केसाची गंभीरपणें दखल घेतली होती. केस काळे करण्याचीं वेगवेगळीं तेलें शान्त्या न्हावीच पुरवूं लागला. तेलाच्या बाटल्या अधिक खपाव्यात म्हणून बाबुली काय काय बोलतो तें आबांच्या कानावर घालूं लागला. याचा परिणाम असा झाला कीं, दिवसांतून दोन-तीन वेळां आबांच्या डोक्यांला तेल चोळण्याचें काम माझ्यावर आलें. शेवटी तेलाचा परिणाम झटपट न झाल्यामुळें दुपारीं जेवणें आटोपल्यावर तासभर आबांचें पिकले केस उपटण्याचीहि आपत्ति माझ्यावर ओढवली होती. मला तंबी देऊनहि दुपारीं केस काढतांना मी झोपतों म्हणून आबांनीं पुढें बक्षीसहि लावलें होतें. दर शंभर पिक्या केसांस एक ढब्बु पैसा असा दर त्यांनीं लावला होता. पण पुढें पूर्वी काढलेले पिके केस मी सांठवतो आणि पुनः मोजून पैसे उपटतो हें त्यांच्या ध्यानीं येतांच त्यानीं बक्षिसाची योजनाच रद्द केली.

यांतून एक चांगली गोष्ट मात्र झाली. आपले केस पिकत आहेत ही बातमी शान्त्यानेंच बाबुलीला कळवली असली पाहिजे असा त्याना रास्त संशय आला. कसा कोण जाणे. पण संशय आला एवढें खरें. पण शान्त्याला हजामतीच्या कामावरून काढून टाकण्याचा विचार त्यांच्या मनांत आला नाहीं. कारण शान्त्याकडून कळत असत त्या गोष्टी कळायलाच हव्या होत्या. पण केसाची बातमी दिल्याबद्दल कधीं तरी किरकोळ सजा देऊन शान्त्याला जिरवण्याचा विचार मात्र आबांनीं पक्का केला होता.

त्याच सुमाराला बाबुलीला अंडवृद्धीचा विकार जडला होता. ती बातमी मला समजतांच भोतरांतल्या पपनसाचा भाव काय आणि पपनसं डझनावारी घेतली तर सवलतीचा भाव काय अशी चौकशी करणारीं कार्डें मी बाबुलीला पाठवूं लागलों. त्यामुळें आधींच बाबुली बेजार होऊन गेला होता.

तेवढ्यांत आबांनीं शान्त्याला मध्यें घातलें.

एकदां रविवारीं शान्त्या दाढी करीत असतांना आबा म्हणाले, 'शान्त्या, एक काम आसा. करशील ?'

'ह्यां काय विचारणां ? तुमचा अन्न खाणारो माणूस मी !'

'ह्यां बघ–बाबुलीनं मुंबयहून पपनसाचा नवीन बी आणलासा. त्यांतला थोडा बीं माका आणून दी. माका म्हणून सांगूं नको, तुका म्हणून घे !'

संवयीप्रमाणें शान्त्या गप्प राहिला.

'अधेली दितलंय. माका फुकट बीं नको.'

'पैशाचा सोडा. आणतंय बीं !'

'पण पपनसाचा हां !' आबांनीं त्याला पुनः आठवण दिली.

आबांची दाढी आटपून शान्त्या बाबुलीच्या घरीं गेला. बाबुलीची दाढी आटोपतांच तिथेंच ओट्यावर रेंगाळत राहिला. स्वतःच्याच दाढीचे खुंट उपटीत उभा राहिला आणि अधेलीच्या आशेनें म्हणाला, 'धनियानु, थोडां पपनसांचा बीं होयां !'

बाबुलीच्या डोक्यांतून संतापाची जबरदस्त सणक गेली. बाबुलीचा लालबुंद झालेला चेहरा शान्त्याच्या नजरेंत येण्याआधींच त्याच्या कंबरड्यांत दाणकन् लाथ बसली आणि खाकेंतल्या हडपासकट शान्त्या ओट्याच्या खाली ओंडक्यासारखा कोलमडून पडला. दुसरी लाथ बसण्याआधीं आपली धोपटी कशीबशी सांभाळीत तो ढुंगणाला पाय लावीत जो पळाला तो थेट आमच्या ओट्यावर विश्रांतीसाठीं आडवा झाला.

तेव्हां आम्ही पोट धरधरून हंसलों.

पण हें कशामुळें झालें हें मात्र शान्त्याला बरेच दिवस कळलें नव्हतें.

आबांनींहि त्याला बरेच दिवस कांहीं कळूं दिलें नव्हतें.

उलट. तुला मारल्याबद्दल फिर्याद नोंदवायची असेल तर बोल. मी माझ्या खर्चानें खटला चालवतो अशी ऑफर मात्र आबांनीं त्याला दिली होती.

पण ती ऑफर शान्त्यानें कधीं स्वीकारली नाहीं. दोन बड्या धेंडांत स्वतःला चिरडून घेण्याची त्याची तयारी नव्हती. सर्वांच्या दाढीला पाणी चोळण्यांत त्याचा जन्म गेला होता. त्याला आबांच्याहि दाढीला हात लावायचा होता आणि बाबुलीच्याहि दाढीला हात लावायचा होता. अखेरपर्यंत त्यानें यशस्वीरीत्या दोन डगडीवर पाय ठेवले होते.

• • •






*जो दगडी बंगला माझ्या मनांत अनेक दिवस घर करून राहिला होता त्यांच बंगल्यांत आम्हीं आलों होतों आणि ज्या घरमालकाला मी गैदीं, अरसिक म्हणून शिव्या देत होतों त्याच भल्या माणसानें माझ्या बेबीला शुद्धीवर आणून वर आम्हाला कॉफी देऊं केली होती. माणूस फारच सज्जन होता. मला लाज वाटली. मीं अधिकच अवस्थ झालों.*

**अ. अं. कुलकर्णी**



> अगदीं किरकोळ गोष्टींत देखील केव्हां केव्हां फार मोठा आशय आढळतो. अनुभवानें तसा अगदीं साधा परंतु तो मनावर फार मोठा परिणाम करतो. प्रतिभावंतांना त्या क्षुल्लक घटनेंत देखील सुंदर कथेची बीजें आढळतात. अशा **कथा बीजांची** एक लेखमाला 'मनोरे' दिपावलीतून चालू आहे. लेखकांनीं याप्रमाणें आपले कांहीं लेख दीपावलीकडे अवश्य पाठवावेत. योग्य निर्णयानंतर स्थान देण्यांत येईल.
>
> **—सं.**

नियति ही एक मोठी कलावंत आहे. मानवी आयुष्यांत ती कांहीं ना कांहीं अद्भुत चमत्कृति घडवून आणते. आयुष्याच्या प्रवासांत निरनिराळ्या काळीं, निरनिराळ्या स्थळीं कांहीं लहानमोठ्या घटना, लहानसहान प्रसंग घडून इतस्ततः पडलेले असतात. प्रवासी विसरूनसुद्धां जातो. नियतीचें कार्य चालूं असतें.—आयुष्याच्या वाटुलींत इतस्ततः पडून असलेल्या या घटना कुठल्या तरी सूत्रानें गुंफल्या जातात. आरंभी एकमेकांशी संबंध नसलेले हे प्रसंग एकाच कृतीचे घटक होते हें पटूं लागतें आणि आयुष्याच्या एखाद्या मुक्कामीं नियतीनें पूर्ण केलेली ही कृति समोर टाकलेली पाहून मानव स्तंभित होतो.

इतरांना ठार असत्य वाटणारी गोष्ट एखाद्याच्या बाबतींत शंभर टक्के सत्य असते.

योगायोग म्हणा किंवा दैवी घटना संबोधा, माझ्या आयुष्यांत अशीच एक घटना घडली आहे. इतरांना खोटी वाटणारी पण अगदीं खरी.

त्यावेळीं मी पुण्याला पेरु-गेटापाशीं ढमढेरे यांच्या वाड्यांत रहात होतो. माझी मावशी संभाजी पार्क समोर एका गल्लींत राहत होती. तिचें स्वतःचेंच तें घर आहे. पुण्यांत जवळचें असें तेवढेंच नात्याचें घर असल्यामुळें मी, माझी आई आणि इतर कुटुंबिया मावशीच्या घरीं जातयेत असूं. डेक्कन टॉकीजवरून जंगली महाराज रोडनें यावयाचें, घोले रोडच्या अगोदरच्या बोळानें डावीकडे वळावयाचे—बोळाचे शेवटीं डाव्या बाजूचें अगदीं शेवटचें घर म्हणजे माझ्या मावशीचें घर.

या बोळांतून जातां-येतां माझें लक्ष एका बंगल्याकडे नेहमी वेधलें जाई. तसाच तो बंगला होता. बंगला कसचा म्हणा एक जुनाट लहानसाच पण दगडी वास्तु. या बोळांत दोन्ही बाजूचे मिळून सतरा अठरा लहानमोठे बंगले आहेत. पैकीं सर्वांत ओबडधोबड पद्धतीनें बांधलेलें हें घर. आवारूं बहुधा अस्वच्छ आणि कांहींसें ओसाड दिसे. हें घर माझ्या डोळ्यांत भरे तें त्याच्या त्या दगडी बांधकामामुळें. मला आकर्षित करील अशी आणखी एक गोष्ट तेथें होती. या वास्तूचे मागील









अनुक्रमणिका

बाजूस ईशान्येच्या कोपऱ्यांत एक भला मोठा डेरेदार आम्रवृक्ष आहे. इतका डौलदार आणि हिरवागार कीं सहज म्हणावेसें वाटे कीं, ' वा! आम्रवृक्ष असावा तर असा!'

एरव्ही बेंगरूळ ठरणारें तें घर या घनदाट वृक्षाच्या सावलींत मला भलतेंच उठून दिसे.

एकदां भरदुपारीं उन्हाचा मी मावशीच्या घरून परत यावयास निघालो होतो. दिवस असून सर्वत्र सामसूम होती. काय वाटलें कुणास ठाऊक! ना ओळख ना देख. मी एखाद्या चोरासारखा या बंगल्याच्या आवारांत शिरलों आणि बंगल्याभोंवती मी एक चक्कर मारली. नशीबानें खैर केली. मला कोणी पाहिलें नाहीं. मला कोणी भेटलें नाहीं. मला कोणी हटकलें असतें तर मी काय उत्तर देणार होतो? जाणीवेच्या आणि नेणीवेच्या सरहद्दीवरून मीही पायमल्ली केली होती.

कम्पौंडच्या बाहेर पडलों आणि झपझप पावलें टाकीत बोळ संपवून एकदाचा जंगली महाराज रोडला लागलों. मोठ्या रस्त्यावर येईपर्यंत घाबरलेलाच होतो. संभावित वेशांतले उचले म्हणून कोणी उद्धार केला असता तर काय करणार होतो?

बंगल्याच्या मागील बाजूस खूपच मोकळी जागा होती. एक पडका हौद होता. दुसरेंहि एक छोटें आंब्याचें झाड होतें.

या बंगल्याचा मालक कोण असेल बरें? अगदींच अरसिक भुक्कड असावा लेकाचा! मला भारी राग आला त्याचा. आवरूं कसें निर्मळ ठेवावयास हवें होतें. इतकी मोकळी जागा पाठीमागें असून चार फुल झाडें असूं नयेत? चिकू, पेरू अशी फळझाडें लावावयास काय हरकत आहे?

कांहीं कारण नसता—संबंध नसता मी त्या अज्ञात घरमालकावर रागवलों होतो. पुढें मावशीच्या घरीं जात येत असता नेहमी हा वास्तु मला दिसत होता आणि पुनः पुन्हा माझ्या मनांत घर करून रहात होता.

एका रविवारीं आम्ही संभाजी पार्कमध्यें गेलों होतों. मला स्वतःला, असें बागेंत जाऊन बसणें मुळींच आवडत नाहीं. मुलांसाठीं विशेषतः हिच्या म्हणण्याला मी संमति दिली होती आणि बागेंत आलों होतों. बागेचा अगदीं बाजार झाला होता. ही गर्दी. माझा जीव बागेंत मुळींच रमेना. मुलांची भेळ खाऊन होईपर्यंत मी जेमतेम धीर धरला, आणि हिला म्हटलें, ' जावूं या आतां परत. ' हिला अर्थातच माझी सूचना मान्य नव्हती. ती म्हणाली, ' एवढी काय घाई आहे? कधीं नव्हे ते आलों आहोंत, बसूं या आणिक थोडा वेळ. ' दादा आणि बेबी घसरगुंडीवर आणि झोपाळ्यावर खेळत होती. ही माझ्याशीं कांहींतरी बोलत होती पण खरं म्हणायचं तर माझं तिच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष नव्हतं. हिनं रागरंग ओळखला आणि म्हटलं उठूं या पाहिजे तर. पण लगेच घरीं नाहीं जायचं. सुशी येथें आली आहे. पपासाहेबांची बदली झाली आणि ते येथेंच आले आहेत सध्या. येथवर आलों आहोत तर उभ्या उभ्या जाऊन येऊं तिच्याकडे. तुमच्या मावशीच्या बोळांत तर ती राहते. त्यांचं स्वतःचंच घर आहे.

' मला माहीत आहे. ' मी तुटकपणें म्हटलें. मुलांना पुकारले आणि आम्ही उठलो.

सुशीच्या लग्नाआधी वर्ष दीड वर्ष सुशी आमच्याकडेच होती. मुलांना तिचा भारी लळा. मावशीकडे जावूं या म्हटल्यावर मुलें आनंदली, बेबी तर फारच अधीर झाली. पार्कच्या गेटांतून आम्ही बाहेर पडलों. जंगली महाराज रोड क्रॉस करायचा होता. तें एक दिव्यच होतें. सहा वर्षांचे चिरंजीव आणि चार वर्षांची बेबी. रविवारची संध्याकाळ. मोटारी, टांगे, रिक्षे, सायकलस्वार रहदारीला खंड नव्हता. मुलांना कसलीच तमा नव्हती. आतां सुशी मावशीशिवाय त्यांना दुसरें कांही दिसत नव्हते. आईबापांचे हात धरून चालणें त्यांना अर्थातच मान्य नव्हते.

आईचा हात सोडून बेबी धूम पळत सुटली. ' बेबी, अग बेबी, थांब...थांब करीत ही तिच्या मागें धांवली. काय होत आहे हें कळण्यापूर्वींच इकडून लॉरी, तिकडून टॅक्सी कर्कश ब्रेक्स लागून दोन्ही गाड्या थांबल्या आणि बेबी रस्त्यावर पडली. पडली ती निपचेत. प्रसंगाचं गांभीर्य राहिलं बाजूला आणि हिनंच रडायला सुरुवात केली. मी बेबीला उचललें. कुठें थोडेंसुद्धां खरचटलें नव्हतें, कुठें रक्तबिंदहि नव्हतें. मग हें काय झालें? बेबी अशी निश्चेष्ट का?

रस्त्यांत हा गोंधळ. कोणी लॉरीवाल्याला शिव्या देत होते तर कोणी टॅक्सीवाल्याला भोसडीत होते. कोणी हल्लीची कार्टी किती वात्य झाली आहेत हें सांगत होते तर टॅक्सीवाला आमच्याच नांवानें बोंबलत होता।

आणिक तमाशा नको म्हणून हिला मी खडसावलें आणि सारे लटांबर घेऊन रस्त्याच्या कडेला आलों.

इतक्यांत, ' काय झालं ग अक्का? कुणाला लागलं, कोण पडलं? करीत सुशीच पुढें आली.

सारा प्रकार लक्षांत घेऊन सुशीनं हिला धीर दिला आणि म्हटलं, 'चल बेबीला आपण डॉक्टरकडे नेऊं. आमच्या घरासमोरच आहेत. कालच आले आहेत. माझ्या चांगल्या ओळखीचे आहेत. '

सुशीने डॉक्टरना आमची ओळख करून दिली. बेबीला फारसें कांहींहि झालें नव्हतें. धक्का ओझरताच लागला होता परंतु फार घाबरल्यामुळें ती बेशुद्ध झाली होती. मामुली उपचारानें ती शुद्धीवर आली आणि रडूं लागली. डॉक्टर तिची समजूत काढीत होते. तिला गोळ्या–चॉकलेट देऊं करून उगी करीत होते. हिचा जीव भांड्यांत पडला. मी डॉक्टरशीं तिकडे कांहीं बोलत आहेसे पाहून ही बहिणीशीं, ' हे कसे वेंधळे आहेत बरंतर बरं आज बेबीचं काय झालं असतं वगैरे कुजबुजूं लागली.

बेबीला थोडा वेळ पडून राहूं देणें अवश्य होते. समोर सुशीच्या घरीं जाऊन तें करणें शक्य होतें. पण डॉक्टर भला गृहस्थ. ते म्हणाले पडूं दे बेबीला इथंच तोंपर्यंत आपण थोडी कॉफी घेऊं. बेबीला थोडी द्यायला हवी. अनायासे सर्वांनाच होईल. अहो तुमच्या नेऊरगांवकरांचे आम्ही फॅमिली डॉक्टर आहोंत. तुम्हाला संकोच करायचें कारण नाहीं—घर नेऊरगांवकरांचं—म्हणजे तुमचंच आहे समजा आणि बसा थोडावेळ इथंच. इतक्यांत माझे साडू पपासाहेबहि तेथें आले. माझा नाईलाज होऊन आम्हाला तेथेंच बसावें लागलें. या साऱ्या गोंधळांत माझ्या अजून लक्षांत न आलेली एक गोष्ट एकदम लक्षांत आली.

जो दगडी बंगला माझ्या मनांत अनेक दिवस घर करून राहिला होता त्यांच बंगल्यांत आम्ही आलों होतों आणि ज्या घरमालकाला मी गेंदी, अरसिक म्हणून शिव्या देत होतों त्याच भल्या माणसानं माझ्या बेबीला शुद्धीवर आणून वर आम्हांला कॉफी देऊं केली होती. माणूस फारच सज्जन होता. मला लाज वाटली. मी अधिकच अस्वस्थ झालों.






अनुक्रमणिका

घर डॉक्टरांचें होतें पण ते पुण्याला कधींच राहात नसत. डिक्ट्रिक्ट मेडिकल ऑफिसरच्या पेशामुळें त्यांना या ना त्या जिल्ह्याच्या ठिकाणीं नोकरीनिमित्त फिरावें लागे. गेलीं दोन वर्षें ते चेंबूरला ' बेगर्स होम 'मध्यें होतें आणि तेथें माझ्या साडूंचे डॉक्टर झाले होते. नेऊरगांवकर फॅमिलीच्या पुढील पिढीला औषधोपचार करीत होते.

डॉक्टर वर्षाकांठी आठदहा दिवस रजा घेऊन पुण्याला येत आणि आपल्या घरीं राहात. दोन-तीन खोल्या स्वतःसाठीं ठेवून बाकी सारें घर त्यांनीं बहिणीलाच मामुली भाड्यानें दिलेलें होतें. परंतु बहीण आणि मेहुणे मात्र घर आपलें म्हणून वापरीत नसावें असें दिसलें. मालकाच्या पश्चात् घराची जेवढी आबाळ होईल तेवढी होऊं देत होते. आवारूची झाडलोट सुद्धां होत नव्हती. मला त्यांच्या वर्तनाचा राग येत होता, वाईट वाटत होतें.

मी डॉक्टरांचे आभार मानले. बिलाबद्दल डॉक्टरांनी मला कांहीं बोलूं दिलें नाहीं. 'आम्ही अन् नेऊरगांवकर पाहून घेऊं' म्हणाले. डॉक्टरांच्या पत्नीनें हिला कुंकू लावलें. आम्ही निघालों. डॉक्टर फाटकापर्यंत पोहोंचवायला आले. घराआंवतीभोंवती न्याहाळणारी माझी नजर आणि माझ्या तोंडावरचे भाव लक्षांत घेऊन डॉक्टर स्वतःशी बोलल्यागत म्हणाले, " आम्ही नुसते नांवाचे मालक. चार आठ दिवसांसाठीं येतो. आपापसांत उगाच वाकुडपणा कशाला ? बोलता येत नाहीं. पण पहा बंगल्याची अवस्था कशी झाली आहे ती. मोठया हौसेनं बांधला होता मी. पण योग कांहीं विचित्र आहे. ओळीनें घड महिना-दोन महिनेसुद्धां मी येथें कधीं राहूं शकलों नाहीं. माझी मिसेस तर म्हणते आहे की विकून टाका हा " बंगला. "

" खरं नाहीं तर काय ? दुसऱ्याचे पैसे देणं होत नाहीं...व्याजावर व्याज चढतंय. उगाच जिवाला घोर. त्या परीस विकून मोकळें झालेलें काय वाईट..." गाऱ्हाणं सांगल्यागत पपासाहेबांकडे पाहात डॉक्टरीण बाई म्हणाल्या.

करकरीत तिन्हीसांजेच्या वेळीं सुवासिनीच्या तोंडून निघालेली कळवळ ऐकून माझ्या काळजांत कालवल्यासारखं झालं.

जरा वेळ पपासाहेबांकडे जाणें क्रमप्राप्त होते. तेथेंहि डॉक्टर आणि त्यांचा बंगला हाच विषय चालूं होता.



सोसायटीचें कर्ज काढून वीस वर्षांपूर्वी डॉक्टरांनी हें घर बांधलं होतं. कर्जाची दामदुप्पट झाली होती. फिरतीच्या नोकरीमुळं, दुसऱ्या लग्नामुळं व मुलांच्या शिक्षणामुळं डॉक्टर आजवर कर्ज फेडूं शकले नाहींत. घरपट्टी, पाणीपट्टी वैगेरे मेहुणेच भरतात. त्यांचाहि कांहीं दोष नाहीं थोड्याशा भाड्यांत भली मोठी असलेली गांवातील जागा सोडून ते डॉक्टरांच्या आग्रहाकरतां येथें राहावयास आले. पूर्वीपेक्षां दुप्पट भाडें डॉक्टरना देत आहेत तरीहि डॉक्टरीणबाई कुरकुर करतात. डॉक्टरना घालून पाडून बोलतात. ' करा वन्सांचीच भर' म्हणतात ! मग मेहुणे स्वतःच्या बायकोवर राग काढतात. त्यामुळें डॉक्टर आणि त्यांची बहीण एकमेकांशी बोलत नाहींत. सख्खी बहीण-भावंडे एकमेकांना केवळ या घरामुळें दुरावली आहेत.

सुनीच्या धरून निघालों तो चांगलाच

उशीर झाला होता. करायचा विचार असून वाहन मिळालं नव्हतं. बेबीला खांद्यावर टाकून मी रस्त्यानें निघालो होतो. ही आणि चिरंजीव माझ्या मागं खरडत होती. डॉक्टरांनीं घर विकून टाकावं आणि मोकळं व्हावं...सध्या घराला भाव आहेत. बिचारा कर्जमुक्त होईल. वर दोन पैसे मिळतील. बायकोची उणी-दुणी बोलणीं थांबतील...बहीण-भाऊ एक होतील...वास्तूला चांगला मालक लाभेल...आवारूं स्वच्छ होईल...काम्पौंड वॉल बांधली जाईल...पुढं मागं बाग होईल...दोन फळझाडंहि लागली जातील......

डोक्यांत विचार चालू होते. हिनं मला तीन-चार वेळा खडसावलं, "अहो लक्ष कुठंय् तुमचं ? रिक्षा मिळत नसला तर टॅक्सीनं जाऊं. हें कार्टेहि खळीला आलंय आणि रस्त्यानं जरा धड चाला कीं. मघा त्या बाईला चक्क धक्का दिलात ! एखादी असती तर शिव्या घातल्या असत्या !..."

इतक्यांत एक टांगा आला.

\+ × +

धंद्याचा व्याप वाढत होता. माल साठवून ठेवायला भाड्याची दोन-तीन गुदामें असूनहि भागत नव्हते. शेडच का होईना पण स्वतःची एक जागा गोडाऊनला असावी असे विचार डोक्यांत येत आणि अशक्यतेच्या निर्णयांत विरून जात. जरूरीपुरती शेड, जागा खरेदी करून बांधावयाची म्हणजे २०-२५ हजार रुपये लागणार होते ! आयुष्यांत शक्य होईल असें वाटेच ना.

परंतु एका गोडाऊनच्या घरमालकानं नोटीस दिली. त्याची जागा त्याला परत हवी होती. भाडं वाढवून देतो म्हणालों. ऐकेना. कायदा भाडेकरूच्या बाजूचा असूनहि निर्धार केला कीं लीजनें का होईना प्लॉट घ्यावयाचा आणि पत्र्याची शेड उभी करायची. जातील चारसहा महिने. होईल पांचदहा हजार कर्ज. पण वाढत्या धंद्याला आपली जागा हवीच !

मला जागा दुकानापासून जवळ असावयास हवी होती, कॉर्पोरेशनकडून तीवर शेड बांधावयास परवानगी मिळावयास हवी होती आणि शक्यतों किंमतींत स्वस्त पडावयास हवी होती. 'आखुड शिंगी बहुगुणी, काळ्या कपिला'चा शोध चालू होता. विजयनगर कॉलनींत थोडी रक्कम, थोडें भाडें अशा वायद्यानें ९९ वर्षांच्या करारानें एक प्लॉट नक्की करण्याच्या विचारांत असतांनाच— एक दिवस आनंद भेटला. आनंद माझा मावस भाऊ. मी अशी एखादी जागा पहातो आहे हें त्याच्या कानावर होतें.

'काय झालं रे तुझ्या जागेचें ? तुझ्या गोडाऊनचं नाहीं जमणार, पण बंगला घेत असलास तर आहे एक छोटासा' त्यानं म्हटलं.

'अरे बंगला घेऊन काय करूं ? मला हवंय् गोडाऊन.'

'तूं बघ तर खरं एकदां घर. पटलं तुला न् वहिनीला तर घेऊन टाकूं. गोडाऊनचा प्रश्न पाहूं पुढें. चांगला चान्स आलाय, थोडक्यांत जमेल. घेणारे खूप भेटतील पण आपल्यापैकीं कुणाला तरी मिळावा म्हणून मुद्दाम तुला सांगायला आलोय. व्यवहार मात्र ४।६ दिवसांतच पुरा करावयास हवा.'

माझा मावस भाऊ एक मोटा व्यापारी मनुष्य आहे. त्याचं 'थोडक्यांत' म्हणजेसुद्धां २५-३० हजारांच्या वरचं हें कलम असणार असा माझा अंदाज होता. एकदम ४।६ दिवसांत इतकी रक्कम उभी करणं माझ्या आवाक्याबाहेरचं होतं.







होना करतां नुसतं बघावयास काय हरकत आहे ? या विचारानें आम्ही त्याच्याबरोबर घर पहावयास गेलों आणि घर पाहातांच चाट पडलों.

हिला अर्थातच तें घर फारसं पसंत नव्हतं. बायकांना व्यवहारांतलं काय कळतंय ? एवढी जागा आणि असं दगडी बांधकाम इतक्या थोडक्यांत...पहिल्याच फेरींत 'विचार करतों' असें आनंदला सांगून आम्ही परत फिरलो.

घनदाट वृक्षाच्या कुशींत असलेलें तें दगडी घर. मागचें तें भले मोठें मोकळे अंगण... वास्तू मनांतून कांहीं केल्या हलेना.

शंकरभाऊने हिशोब मांडले. पुनः पुन्हा समजून दिले. चार-पांच वर्षांत कर्ज फिटेल, नक्की फिटेल सांगितलें. मधुकाकानें धीर दिला 'बाबा घेऊन टाकायचं घर.'

तात्या, नाना, भाऊ, अण्णा, काका वगैरे मित्रांकडे गेलो. पैसे उभे केले. बी. ए. डिग्रीचा आयुष्यांत मागें एकदां उपयोग झाला होता. तुरुंगांत डेटिन्यू होताना 'ब' वर्ग मिळाला होता. देशस्थ ऋग्वेदी असण्याचा फायदा यावेळीं मिळणार होता. सोसायटीच्या मॅनेजिंग कमेटीनें मला मी देशस्थ ऋग्वेदी असल्यामुळें सभासद करून घेतले आणि घर मला देऊं केलें.

कर्ज काढून घर घेत होतो. निघतांना कै. बाईचें स्मरण केलें. ती. आत्याबाईचा आशीर्वाद खिशांत होताच. मावशीला नमस्कार करून निघालों. आम्ही कचेरींत जाऊन घर खरेदी करून टाकलें.

'आयतें घर घेतल्यामुळें वास्तुशांतीचा प्रश्न नाहीं तरीहि अमुक दिवशीं अनायसा अमृत सिद्धीचा योग येत आहे.त्या दिवशीं होम हवन–गृहशांति करा, सत्यनारायण करा आणि मगच गृहप्रवेश करा' असा सल्ला हिच्या वडिलांकडून आला. त्याप्रमाणें केलें.

धार्मिकविधीची गडबड संपली. जेवणीं-खाणीं झालीं. सर्वांनाच माझ्या आईची आठवण होत होती. वडील मी बारा दिवसांचा असतानाच गेलेले. पण आई नुकतीच गेलेली. सहाजिकच तिची अनुपस्थिति साऱ्यांना जाणवत होती.

मावशीला विशेष भरून आलें. तिनें मला जवळ घेतलें. पोटाशीं धरून पोटभर हुंदके दिले. म्हणाली, 'बाई पाहिजे होती रे माझी आज ! एकदा अशीच माझ्याकडे चार दिवस राहायला आली होती. सडा रांगोळीचें फार वेड, फरशीवर सुद्धां सडा घालायची अन् रांगोळी काढायची–चांगलीं चांगलीं फुलं देवाला म्हणून तोडायचीं–तिला कुठं डोक्यांत का घालायची होती ?—पण मुलां–सुनांना तिचं तें सडा घालणं अन् फुलं तोडणं आवडत नसे. मुलंच तीं. त्यांचें विचार आचार निराळे. एक दिवस मावशीला कांहींतरी बोलून गेलीं. तिला तें लागलं. त्यावरून माझ्याशीं भांड भांड भांडली. माझाहि मग तोल गेला. शब्दांत शब्द वाढला. मला म्हणाली होती, 'माझाहि अंतू मोठा होईल. तुझ्या एवढा नाहीं तर नाहीं पण लहानसा बंगला आम्हीं घेऊं. करीन मी सडा रांगोळी.' आणि तेव्हापासून आली नाहीं बघ पुन्हां आमच्याकडे.रागावली होती आमच्यावर. तिला किती आनंद झाला असता. मला किती बोलून घेतलं असतं, बोलली असती तर चाललं असतं पण हें पाहायला आज ती हवी होती. अंतू तूं तिचें पांग फेडलेस बरं.'



'गंगाबाई, मला कांहींच माहीत नाहीं.' मी मावशीची समजूत घालीत होतो. 'असला तरी तुमच्यावरचा बाईचा राग आतां संपला. अदूनेंच नाहीं का सारी खटपट केली. म्हणून तर हें घर आपल्याला मिळालं. तिला तें काय दिसलं नसेल ! आतां तिच्या जागीं तूंच आहेस ना मला !'

तीर्थप्रसाद आणि कॉफीपान संपायला रात्रीचे साडेनऊ वाजले. झोपायला जायला तर अकरा वाजले. सकाळपासून माझी गृहलक्ष्मी आज उभी होती. दमून गेली होती. अंगाखांद्या-वरचं आणि कोरं वस्त्रं सारं तसंच होतं. कॉटवर डोळे मिटून पडली होती. मिटल्या डोळ्यांतून अश्रु ओघळत होते. घाबरून मी जवळ गेलों. तशी ती उठून बसली. माझ्या पाठीवरून हात फिरवूं लागली. आजवर कधीं न अनुभवलेली माया तिच्या हातांतून ओसंडत होती. मला म्हणाली, 'माझा शब्द खरा केलात तुम्ही आज. तुम्हाला वाईट वाटले असते म्हणून आजवर बोलले नव्हते–'

'चार वर्षें झाली असतील. सुशीचं लग्न झाल्यानंतर वर्षादीड वर्षानं आम्ही दोघी खेडला दादांकडे गेलों होतो. सुशीच्या लग्नांत झालेल्या खर्चावरून सहज गोष्टी निघाल्या. बोलण्याचा ओघ वळूं नये तिकडे वळला. दादा उगाचच माझ्यावर भडकले–'

'सुशीच्या नवऱ्याला सरकारी नोकरी होती. ते श्रीमंत होते म्हणून कर्ज काढून मी जास्ती खर्च केला. तुला काय करायचंय त्याबाबत विचारून ? सुशीला तुझ्यापेक्षां चांगलं स्थळ मिळालं. तिला घरदार मिळालं म्हणून तुला द्वेष वाटतोय सुशीचा !'

'वाईट वाटलं मला. दादाचा फार राग आला. आमची माई गेल्यापासून आणि ही दुसरी माई घरांत येईपर्यंत मीच सारं केलं. सुशी धाकटी. तिचा द्वेष मी कसा करीन ? आणि तिच्या लग्नांत दादांनी काय हो केलं ? आयत्यावेळीं तर आले पाहुण्यासारखे ! सारं आपल्यालाच पडलं. कष्टापरी कष्ट, पैसेहि वेळेला तुम्हीच पुढे केले होतेत ?'

'तसं कांहीं बोलली नाहींस ना तूं ?' मी म्हटलें, 'अग कोणी कसाहि अर्थ काढला तरी आपण सरळ वागावं. सहन करावं. बाई नेहमी म्हणायचीं, 'दम असेल पोटीं तर बरं होईल शेवटी.' मी म्हणालों

'मी कांहीं फारसं बोललें नाहीं पण एवढं बरीक म्हटलं कीं, आम्हांलाहि कांही कमी नाहीं आम्हीसुद्धां बांधूं बरं घर.' आणि आज तुम्ही माझा शब्द खरा केलात. अगदीं सुशीच्या समोर माझंहि घर झालं.' या घटनेचा अर्थ लावीत मी पडले होते. कांहीं कडू कांहीं गोड. दादांच्या तर बिचाऱ्यांच्या लक्षांतसुद्धां नसेल बोललेलं. त्यांना किती आनंद झालेला दिसला आज. मला अगदीं तोंडभर त्यांनी आशीर्वाद दिला आणि नंतर मग माईची आठवण झाली.

'पुण्याला दोन खोल्यांचं कां होईना आपल्याला घर घ्या' असं ती दादांना नेहमी म्हणे. पण दादांनीं तिचं कांहीं ऐकलं नाहीं. गेली शेवटी बिचारी. आज असती तर...'

'माईची आठवण झाली आणि रडूंच आलं...' तिनं सांगितलं,

डॉक्टर आणि डॉक्टरीणबाई दोघांनी पैसे घेतांना संतुष्ट मनाने घेतले. म्हणाले, 'कुल-

( पान ३० वर चालू )







# हरवलेला दगड

ललित वालावलकर



शाळेंत असतांना मला ती फार आवडायची. आणखीहि खूप मुलींना ती हवी हवीशी वाटे. तसं पाहिलं तर तिच्यासारख्या गोऱ्या, सडपातळ, मोहक चेहऱ्याच्या मुली इतर पुष्कळ होत्या. नव्हे सडपातळपणा हा एक त्या वयाचा सामान्य गुणधर्म होता. तिचे केसहि दृष्ट लागण्याजोगे होते. भुऱ्या रंगाचें, कुरळे आणि लांबलचक. सहसा वळणं वळणं घेत वाढणारे कॅस लांबच लांब असत नाहींत. परंतु तिचे होतें. आम्ही दोघी हिरवळीवर हातांत हात घालून शेजारी शेजारी बसलों कीं मागून कुणी ना कुणी आमच्या वेण्या एकमेकींना जोडून खेंचत, अधिक लांब वेणी कुणाची याचं मोजमाप घेत असे. आतां आठवतं, तिचीं बोटं धरायला माझाच हात आधीं पुढें जाई. तीं बोटंदेखील निमुळतीं, सुंदर होतीं. आपली बोटं ती सराईतपणें हार्मोनियमच्या पट्ट्यावर फिरवूं लागली, कीं बाकीच्या सर्व मैत्रिणी लुब्ध होऊन जात. पण कुणाचं असं लुब्ध होणंसुद्धां तिला त्या वयांतहि खपत नसावं. मधेंच बसल्या बसल्या एक चाळा म्हणून आपलीं तीं निमुळतीं, लांब, गोरीपान बोटं वेडीवांकडी वांकवून एखाद्या महारोग्याच्या बोटांचा आकार त्यांना देण्यांत तिला गंमत वाटे. मग आजूबाजूच्या आम्हीं आपली स्वतःचीं बोटं तशीच वेडीवांकडी वळवण्याचा प्रयत्न करीत असूं. परंतु इतकीं सुंदर बोटं इतकी विद्रूप करणं फक्त तिलाच जमे.

आजहि समजत नाहीं, तिच्याविषयीं इतकी ओढ मला त्या वयांत कां वाटत असे ? ती श्रीमंत बापाची मुलगी होती म्हणून, एकुलती एक तर खास नव्हती. तिच्या राहणींतहि डामडौल नव्हता. माझ्याकडे वर्षानुवर्षें फक्त दोन फ्रॉक असायचे. त्यांचे रंगहि ठरलेले. एकाचा गुलाबी, दुसऱ्याचा निळा. तिच्याकडे फार तर चार फ्रॉक असतील. त्यांतला एक पकडापकडी खेळतांना एकदां मी ओढून फाडला. इतर मुली अशावेळीं रडून भांडून केवढा गहजब करायच्या. कदाचित् घरीं गेल्यावर वडील माणसांकडून जो बोलण्याचा अहेर मिळणार, त्यांतील कांहीं अंश आधींच गुन्हेगाराला अर्पण करावा हा हेतू असेल, परंतु खेळाच्या आवेशांत तिचा फ्रॉक मी मागून ओढला आणि तो फाटला, तेव्हां मनांतून मी चांगलीच घाबरले. शांतीनें माझ्या दुष्कृत्याचा निषेध केला, मीरेनें हळहळ व्यक्त केली. शकूनें माझ्याशीं कट्टी करून माझी मैत्री तोडून टाकण्याचा तिला सल्ला दिला. परंतु तिनें तोंडावरून निथळणारा घाम निपटला, बांगडीतली सेफ्टी पिन लाधून कपड्याचे दोन फाटके कोपरे सांधले





अनुक्रमणिका

*ही जन्मापासूनच प्रेमाच्या सर्व विकारापासून अलिप्त*
*होती कीं तिच्या सौंदर्याचा दुसऱ्यावर होणारा परि-*
*णाम बघून ती अशी झाली होती—विषण्ण,*
*थंड आणि मायेच्या जंजाळापासून दूर,*
*पाण्यांत राहूनहि कोरडी ठणठणीत ?*

आणि निर्विकारपणें पूर्ववत् पळायला सुरवात केली. माझी मैत्री तोडायचा प्रश्नच उद्भवला नसावा, कारण तिला फ्रॅंकचं प्रेम नव्हतं आणि माझंहि नव्हतं—असं आतां वाटतं.

नंतर बरीच वर्षें ती भेटली नाहीं. अधूनमधून बाकीच्या मैत्रिणीं-पैकीं कुणी ना कुणी भेटत. देशमुख वकिलांची सून, मिनिस्टर पाटलांची बायको, डॉक्टर कु. शीला, सचिवालयांत कारकुनी करणारी सुमित्रा आणि तिच्याच डिपार्टमेंटची वरिष्ठ ऑफिसर कार्णिक... बदलत्या वयाच्या, निराळ्या आडनांवांच्या आणि पालटलेल्या चेहऱ्याच्या अनेक मुली भेटत.

'काय ग पमे, किती लठ्ठ झालीस ? ओळखलं नाहीं तुला.'

'हल्लीं कोठें असतेस ? हा मुलगा काय तुझा ?'

'घरीं ये ना एकदां. हा घे माझा पत्ता.'

'दीक्षित बाई आठवतात काय ग ? आणि मिस् विल्सन् ?'

अशा आमच्या गोष्टी होत. एकमेकींच्या पाठीवर थाप मारून मधलीं कांहीं वर्षें झालीच नाहींत असं भासवण्याचा आम्ही प्रयत्न करून बघत असूं. परंतु खांद्यावर टेकणारे हात मृदु राहिलेले नसत, आणि पाठीचीं हाडंहि पूर्वीसारखी बोंचत नसत. खळखळून हसताना कधीं क्वचित् तीस वर्षांच्या प्रौढेंतून बारा वर्षांच्या एका मुलीचा आवाज स्मरणाच्या तारा छेडीत अंतःकरणांत घुसूं पाही. पण तेंहि वारंवार नाहीं.

अशा वेळीं संधि मिळताच मी प्रत्येकाला विचारीत असे, 'सीमंतिनी कधीं भेटली होती तुला ? ती कोठे असते ? तिची काय हालहवाल ?'

एकदां समजलं, सीमंतिनीचं एका डॉक्टराशीं लग्न झालं. नंतर कळलं, ती मध्यप्रदेशांत राहते—गांवाचं नांवसुद्धां विचित्र. मुलंबाळं आहेत, नवरा चिक्कार श्रीमंत आहे.

कधीं कुणी म्हणालं, 'आपल्या वर्गांत सीमंतिनी होती, तुला आठवतं. सर्वांत सुंदर होती बघ ! तिचा नवरा मुंबईत आला कीं, आमच्याचकडं उतरतो. फार छान आहे स्वभावानें.'

बाकीच्या गप्पा अर्धवट ध्यान देऊन ऐकतां ऐकतां मी एकाएकीं खडबडून जागी झाल्यासारखी विचारतें,

"आणि सीमंतिनी ग ? तीसुद्धां तुमच्याकडे येते का ? कशी दिसते आतां ?"

"नाहीं बाई. तो एकटाच येतो. तिला कितीदां बोलावलं, पण आली नाहीं कधीं. तिच्या सासऱ्यांची आणि आमच्या मामंजींची खूप दोस्ती. नवरासुद्धां इतका निगर्वी आहे !"

मला हळहळ वाटते. इतकीं वर्षें नाहींशी झालेली सीमंतिनी कुणाच्या नवऱ्याच्या बापाची तिच्या नवऱ्याच्या बापाशीं दोस्ती म्हणून कां होईना, पण हातीं लागूं पहात होती. काय वेडी आहे ही मैत्रिण. अशी कशी सीमंतिनीला निसटूं दिली ? आग्रहानें जवळ ओढून पुन्हां आपल्या वर्तुळांत तिला बंदिस्त करायचं हिला सुचलं नाही ?

त्यानंतर मध्यप्रदेशांतल्या त्या विचित्र नांवाच्या गांवीं जाण्याचा प्रसंग येतो. निदान सीमंतिनीचं घरदार त्याच गांवीं आहे, अजूनहि ती त्याच गांवांत राहाते, ही बातमी मी मिळवूं शकते आणि कांहीं हरवलेली मौल्यवान चीज पुन्हां सांपडणार या आनंदांत प्रवासाला निघते.

गांवातल्या बाजारपेठा पहात नाहीं, प्रेक्षणीय स्थळांची चौकशी करीत नाहीं, बरोबरचीं माणसं आपापलीं कामं करतात, आणि मी सीमंतिनीचा पत्ता शोधून काढतें. त्रास पडत नाहीं, कारण सीमंतिनीचा नवरा त्या गांवांतली एक प्रसिद्ध व्यक्ति असते आणि माझी मैत्रिण ? तिच्याविषयीं मात्र तिच्या अस्तित्वाखेरीज कुणींच कांहीं बोलूं इच्छित नाहीं.

पण हरवलेल्या धनाचा मोह मला सहजासहजीं सुटत नाहीं.

मी सीमंतिनीच्या घरांत प्रविष्ट होतें.

सीमंतिनीचं घर सुंदर असतं, मुलंहि सुदृढ, देखणी आणि स्वच्छ कपडे केलेलीं असतात.

बागेंतल्या झोपाळ्यावर बसून सीमंतिनी माझ्याशीं गप्पा मारते. खूप वर्षांनीं आपल्या प्रेमाचं एखादं माणूस भेटलं, कीं हुरळून गेलेल्या स्त्रीला त्यावेळीं काय करूं आणि काय नको असं होऊन जातं. कुणी आपल्या घराचा कोपरा न् कोपरा—कोठीच्या खोलीपासून म्हशीच्या गोठ्यापर्यंत तुम्हांला दाखवण्यासाठीं हिंडतात. कुणी स्वतः लावलेल्या प्रत्येक फुलझाडाचा इतिहास सांगत बसत. कुणी आपल्या मुलामुलींच्या बारीक सारीक आवडी निवडींचं वर्णन करत, तर अशीच एखादी सगळ्या अवांतर गोष्टींना दूर लोटून एखाद्या थिजलेल्या जखमेवरची खपली मुद्दाम तुमच्या दृष्टीसमोर काढून पाहाते. निरनिराळी माणसं अशी कां वागतात.

केवळ प्रेमाचं माणूस खूप वर्षांनीं भेटलं म्हणून. या पलीकडे कारण कांहीं नाहीं.

पण सीमंतिनी यापैकीं कांहींच करीत नाहीं.

'हें आमचं घर ना तें सासऱ्यांनीं बांधलं. वसंता, दाखव रे माव-शीला आपलं घर. माझे बाई पाय दुखून येतात वर खालीं करतां करतां.....

'सुमन मावशीला जुईची फुलं हवी असतील तर पाठीमागे जाऊन काढून आण. बाईना म्हणावं छानपैकीं वेणी घालून द्या.'

'मोहन, मावशीला तुझी लायब्ररी दाखव हं. तुझ्यासारखाच पुस्तकांतला किडा आहे, आमचा मोहन.

'काय ग, तुला हॉस्पिटल बघायचं आहे का आमचं ? डॉक्टर घरीं आलें, कीं सांगते तुला न्यायला. बाकी काय बघायचं त्या हॉस्पिटलांत ? येऊन जाऊन पेशन्ट. मला नाहीं बाई जायला आवडत तिथें.'

सीमंतिनीच्या नवऱ्याला मात्र माझ्या येण्यामुळें खूप आनंद झाल्यासारखा वाटतो.

'हें काय, तुझ्या मैत्रिणीला ठेवून नाहीं घेत सीमन् ? उद्यां जेवायला तरी आलंच पाहिजे म्हणून सांग. आपण सर्व मिळून एखादी पिकनिक् ठरवूं या काय ? इकडे जवळपास तुम्हांला काय बघायचं आहे अजून ?








ज्या शद्वांची अपेक्षा मी सीमंतिनीकडून केलेली असते, तेच शद्व त्या तिऱ्हाइताकडून ऐकतांना मला चुकल्या चुकल्यासारखं वाटतं. तरीहि सीमंतिनीच्या वागण्याचं मी समर्थन करूं पाहतें. असं कसं होईल ? हिच्या भेटीची आज इतकी वर्षं मला ओढ लागली होती, आणि मला भेटून हिला अजिबात आनंद वाटला नाहीं, ही गोष्ट अशक्य आहे. वरकरणी तसं भासलं तरी तें सत्य नव्हे. जिव्हाळ्याच्या उर्मी हिच्याहि मनांत उठत असणार, फक्त सीमंतिनी उघडपणें त्या दाखवीत नाहीं, इतकंच.

दुसऱ्या दिवशी मी तिच्या घरीं जेवायला जाते—नवऱ्याचा हिरमोड होऊं नये म्हणून.

जेवणाचा बेत उत्तम असतो, कारण घरीं नेहमींच पाहुण्यांची वर्दळ, तेव्हां नोकरचाकर आपापल्या कामांत तरबेज असतात. स्वतः पदर खोंचून आपलं पाककौशल्य मला दाखवीणं दूर राहिलं, सीमंतिनीनें इकडची काडी तिकडे केली नसावी अशी शंका मनाला चाटून जाते. आज ती व्हरांड्यांतल्या एका खुर्चीत बसून गप्पा मारते.

बंगल्याच्या पायऱ्यांपासून लांबवर थेट फाटकापर्यंत जास्वंदीची आणि कण्हेरीचीं झाडं ओळीनं लावलेलीं असतात. त्या लाल, पांढऱ्या, गुलाबी फुलांची रचना मोठ्या चातुर्यानें केलेली दिसते. आंत दिवाणखान्यांत एक भला मोठा कांचेचा झुंबर असतो, त्याचे लोलक इंद्रधनुष्याचे रंग आजुबाजूला फेकतात.

सीमंतिनीहि तिकडे बघते.

'मी तें झुंबर व्हेनिसहून आणलं.'

'कधीं गेली होतीस युरोपला ?'

'पांच वर्षं झालीं—त्यांच्याबरोबर. नाहींतर माझं काय काम होतं तिकडे. मोहन चार वर्षांचा होता. त्याला सासूबाईकडे ठेवून वर्षभर हिंडत होतों आम्हीं. जिकडे तिकडे बायको कशाला लागते ग यांना बरोबर ?'

नवरे एकएकटे हिंडतात, म्हणून चिडणाऱ्या बायका पुष्कळ आढळतात. माझ्या मैत्रिणीची तक्रार असाधारण असते.

'कधीं कधीं माझा जीव विटून जातो. सारखं इकडे चल, तिकडे चल, तिकडे चल. सर्व ठिकाणीं बायकोचं प्रदर्शन कशाला करायला हवं ! एकटं जाता येत नाहीं का ?'

बाहेर मोटरचा हॉर्न वाजतो आणि लांब लांब टांगा टाकत एखाद्या लहान मुलाच्या उत्साहानें धांवत पळत आल्यासारखा सीमंतिनीचा नवरा पायऱ्यांकडे येतो.

"सीमन् यांना घेऊन दुकानांत जायचं असेलना तुला म्हणून मुद्दाम मी लौकर आलो बघ. तुम्हीं कार घेऊन जा दोघी. अजून तयारी नाहीं का झाली ?"

सीमंतिनीचा चेहरा रुष्ट दिसतो, आणि "आतां मलासुद्धां तुझ्याबरोबर पातळं घ्यावीं लागणार" असं पुटपुटत ती उठते.

मला मात्र तिच्या नवऱ्याबद्दल निष्कारण आपलेपणा वाटूं लागतो. हिच्याकडे सहवासाची ओढ नाहीं, मायेची आंच नाहीं. अपेक्षेची तगमग नाहीं, मत्सराचा क्लेश नाहीं, निराशेचं दुःख नाहीं, धडधडत्या अंतःकरणाची उत्सुकता नाहीं आणि हिरमुसलेपणाहि नाहीं.

हिच्याजवळ आहे काय, तर एक थंडगार, यतिमुनींनी हेवा करावा असा निर्विकारी अलिप्तपणा.

ही जन्मापासूनच प्रेमाच्या सर्व विकारांपासून अशी अलिप्त होती कीं तिच्या सौंदर्याचा दुसऱ्यांवर होणारा परिणाम बघून ती अशी झाली होती—विपण्ण, थंड आणि मायेच्या जंजाळापासून दूर, पाण्यांत राहूनहि कोरडी ठणठणीत !

• • •









अनुक्रमणिका



वाचकांना अडलेल्या चमत्कारिक प्रश्नांना उत्स्फूर्त उत्तरें देण्यासाठीं प्रस्तुत सदराची योजना सुरू झाली आहे. मराठी साहित्यांतले एक अष्टपैलू लेखक वाचकांकडून येणाऱ्या प्रश्नांस उत्तर देण्यास सिद्ध झाले आहेत. मात्र ह्या शरसंधानांमुळें वर्मी घाव बसल्यास त्याचें पाप माथीं नको म्हणून तूर्त अनामिक अवस्थेंतच त्यांनी हें कार्य पत्करलें आहे. वाचकांनीं आपले सुबोध प्रश्न सुवाच्च अक्षरांत लिहून पाठवावे. अवाच्य प्रश्नांना उत्तरें दिलीं जाणार नाहींत.

**श्री. सुरेश खानोलकर,** गोरेगांव

**प्रश्न : तुम्हाला जर एखाद्या महिला मंडळाच्या स्नेहसंमेलनाचें अध्यक्षपद दिलें तर तुम्हीं महिलांना कोणता उपदेश कराल ?**

**उत्तर :** बायांनो, मंडळें बरखास्त करा आणि संसार सांभाळा.

**प्रश्न : माझ्या एका मित्राला नाटकांत काम करायची फार हौस आहे. त्यासाठीं त्यानें काय करावें ?**

**उत्तर :** प्रथम अलिकडे होणारीं नाटकें पहावीं म्हणजे काम कसें करूं नये ह्याचें त्याला ज्ञान होईल.

**प्रश्न : पहाटेचीं स्वप्नें खरी ठरतात असें म्हणतात तें कितपत खरें आहे ?**

**उत्तर :** दिवस उजाडला असें पडणारें स्वप्नच फक्त खरें ठरतें. बाकी सर्व अपचना-पोटीं काल्पनिकच ठरतात.

**प्रश्न : तुम्हाला जर परदेश पर्यटनाची संधि मिळाली तर तुम्हीं प्रथम कोणत्या देशाला भेट द्याल ?**

**उत्तर :** रुआंडा उरुंडी.

**प्रश्न : पंडित नेहरूनंतर कोण पंत-प्रधानं व्हावें असें तुम्हांस वाटतें ?**

**उत्तर :** विजयालक्ष्मी पंडित (नेहरू)

**श्री. दत्ता झगडे,** उमरखाडी, मुंबई

**प्रश्न : जित्याची खोड मरणापूर्वी कशी जाईल ?**

**उत्तर :** खोड मोडून.

**प्रश्न : भावना व विचार ह्या दोघांचें नातें काय ?**

**उत्तर :** बिजवरांच्या पूर्वोत्तर अपत्यांचें.

**प्रश्न : सभोंवतालच्या वातावरणांत मनाचें मांगल्य कसें बरें टिकवावें ?**

**उत्तर :** पॉयशा वापरून.

**प्रश्न : मन ही काय चीज आहे ?**

**उत्तर :** मन हें मानवतेचें बीज आहे.

**प्रश्न : कोण, कुठून आला व कुठें चालला—हें मजला हो कळेल कां ?**

**उत्तर :** ही नस्ती उठाठेव कशापायीं ?

**श्री. सुधाकर गो. काटे,** मालेगांव

**प्रश्न : स्त्री ही कुठल्या बाबतींत पुरुषापेक्षां वरचढ आहे ?**

**उत्तर :** उंच टांचाच्या बुटाबाबतींत.

**प्रश्न : आपण अजून किती दिवस गोषांत राहाणार ?**

**उत्तर :** पृच्छकांची नजर सुधारेपर्यंत !

**प्रश्न : एकपक्षीय लोकशाही आणि हुकूमशाही यामध्यें फरक काय ?**

**उत्तर :** लोकशाहींत एकपक्षीय हुकूम असतो तर हुकूमशाहीत एकलोकी पक्ष असतो.

**श्री. म. य. पांचपोर,** महाल, नागपूर

**प्रश्न : मला लेखक व्हावयाचें असल्यास मी कथांचें कोणत्या दृष्टिकोनांतून वाचन करावें ?**

**उत्तर :** संपादकाच्या आणि वाचकाच्या.

**श्री. गजानन साळुंके,** पेण

**प्रश्न : ‘डोळे हे जुलमि गडे रोखून मज पाहूं नका’ हें नायिका कोणाला उद्देशून म्हणतें ?**

**उत्तर :** अधु दृष्टीच्या नायकाला.

**प्रश्न : मुलाचें बारसें करून त्याला नांव कां ठेवतात ?**

**उत्तर :** दुसरें नांव कोणी ठेऊं नये म्हणून.

**प्रश्न : न्यायालयें बंद केलीं तर काय होईल ?**

**उत्तर :** गुन्हे बंद होऊन वकिल उपाशी मरतील.

**प्रश्न : कुलिन स्त्रियांनीं रंगभूमीवर काम करावें काय ?**

**उत्तर :** कुलीन स्त्रियांना घरांत काम करणें जिथें कमीपणाचें वाटतें तिथें रंगभूमीवर काम करणें त्यांना कसें शोभेल.

**प्रश्न : आधुनिक नाटकांत हिरो कोण ?**

**उत्तर :** पार्श्वसूचक.

**प्रश्न : रंगभूमि आणि जीवन ह्यांत फरक काय ?**

**उत्तर :** रंगभूमीवर चांगलें काम केलें तर नटाला टाळी मिळते, उलट जीवनांत टाळी मिळाली नाहीं तर नट वाईट काम करण्यास प्रवृत्त होतो.

**कु. शैला देशमुख,** ग्रँटरोड.

**प्रश्न : हल्लीच्या बॉलपेनच्या युगांत टिपकागदाचा उपयोग काय ?**

**उत्तर :** लस्सींत वापरण्यासाठीं.

**प्रश्न : समर्थांघरच्या श्वानाला कोण मान देतात ?**

**उत्तर :** समर्थ कुटुंबियांचें असमर्थ शेजारी.








अनुक्रमणिका

**विनायक संपत** ( वाळकेश्वर )

**प्रश्न : मी ग्रॅज्युएट आहे., टायपिंग येतें, कमीतकमी पगारावर नोकरी करायची तयारीहि आहे पण जिथं जिथं इंटरव्ह्यूला जातो तिथून हात हालवित यावं लागतं. माझे मित्र म्हणतात कीं ज्याला पर्सनॅलिटी म्हणतात ती माझे-कडे नाहीं. काय कारावं म्हणजे पर्सनॅ-लिटी 'ग्रेसफूल' होईल ?**

**उत्तर :** त्यांतल्या त्यांत सोपा उपाय एकच ! **दीपावली** नियमित वाचणें. पहा करून !

**प्रश्न : मनुष्य मेल्यावर त्याचा प्राण देहाला सोडून जातो. जातांना तो देहाला काय म्हणत असेल ?**

**उत्तर :** आम्ही जातो आमुच्या गांवा—

**कु. आशा टिपर्णीस** ( महाड )

**मनुष्य आणि सिनेमा यांची तुलना कराल का ?**

**उत्तर :** जरूर: दोघेहि चल (अचल नव्हे असे) आहेत. दोघांवर सरकारी नियंत्रणें आहेत. दोघांनाहि भरपूर टॅक्स द्यावा लागतो. 'पडल्या 'मुळें दोघांचीहि इतिश्री होते.

**सुबोध आचरकर** ( अंधेरी )

**प्रश्न : अत्यंत सुंदर-सौजन्ययुक्त आणि पदवीधर स्त्रिया कुठें जास्त आहेत ?**

**उत्तर :** पदवीधर स्त्रिया प्रत्येक मोठ्या शहरांत कमीजास्त प्रमाणांत आढळतील, सुंदर स्त्रियाहि कुठें ना कुठें (चुकून) आढळ-तील आणि सौजन्य ! तारुण्यांत प्रवेश करतांच स्त्रियांना सौजन्य तोडून जातं असं जाणते म्हणतात.

**वनिता देवधर** ( दादर )

**प्रश्न : जीवनांत यशस्वी व्हायचं पण आपणावर टीका होऊं नये अशी इच्छा आहे तर त्यासाठीं काय करावं ?**

**उत्तरः** : यशस्वी टीकाकार व्हावं.

**प्रश्न : चारित्र्य आणि पैसा यांचा संबंध आहे का ?**

**उत्तर :** चरित्रहीनास पैशानें चारित्र्यवान् बनतां येतं.

**प्रश्न : तुम्ही काल केलेल्या चुका आणि उद्या आपलं कसं होईल ही वाटणारी भीति या दोहोंचं तुम्हीं काय करतां ?**

**उत्तर :** आजच्या चहाच्या कपांत दोहोंना बुडवून वरती पाव-लोणी खातों.

**सुलभा देशमुख ( ठाकुरद्वार )**

**प्रश्न : भारताची ब्यूटी क्वीन व्हावं असे मला वाटतं, त्यासाठीं काय करूं ?**

**उत्तर :** अद्याप तुम्हाला सोळावं वर्ष लागलं नसेल तर तोपर्यंत थांबा. 'भारताची ' नच जमल्यास एखाद्या 'भरताची' ब्यूटी क्वीन नक्की व्हाल.

**दत्ता सावंत** ( कुर्ला )

**प्रश्न : चाळीशीनंतर पुरुष मवाली** ( Scorndral ) **बनतो असं बर्नार्ड शॉ म्हणतो. तो स्त्रियांविषयी मात्र कांहींच म्हणत नाहीं. हें स्त्री दाक्षिण्यामुळें कां ?**

**उत्तर :** नाहीं. शॉसाहेब धूर्त होते. तरुण स्त्रियांच्या वयाचा काटा विसाव्यानंतर इतक्या मंद गतीनं चालतो कीं तो चाळीसा-पर्यंत कधींच पोचत नाहीं हें शॉना अनुभवानें माहीत झालं होतं.

कु. **संतोष सामंत** (पुणें)

**प्रश्न : जेव्हां माझं माथं गरम होतं तेव्हां 'प्रश्न पंचायत' वाचतें आणि तें थंड होतं. संपादक, आपला अनुभव ?**

**उत्तर :** प्रश्न पंचायतीचे प्रश्न वाचतों आणि माझं डोकं गरम होतं.

**प्रश्न : लग्नामध्यें संगीताला फार स्थान आहे असं कां ?**

**उत्तर :** ज्या बिचाऱ्या पुरुषाचं लग्न होतं, त्याला पटावं कीं त्याला वाटतो तितका संसार बदसूर नाहीं.

**गोपाळ गणपत** (हैद्राबाद)

**प्रश्न : तरुणींच्या अश्रूंची लांबीरुंदी सांगाल कां ?**

**उत्तर :** विश्वाहून लांब आणिमहासागराहून खोल असा असतो तो. आपला अनुभव !

• • •

---

[ पान २५ वरून ]

कर्णी, लोक म्हणतात मला हें घर लाभलं नाहीं पण लोक किती वेडे आहेत पहा. मी घर बांधलं तेव्हां प्लॉटसुद्धा सारे आठ हजार रुपये लागले. माझ्या पाठच्या बहिणीचं गोकूळ गेलीं कित्येक वर्षे येथें आनंदानं नांदत आहे. आम्हीही नाहीं म्हटलं तरी दरवर्षी येथें महिना-पंधरा दिवस येऊन राहतोच. आज मी हें घर जवळ जवळ तिप्पट किंमत घेऊन विकलें आहे. माझें सर्व कर्जपाणी फिटून घरांत मूळ घातलेली रक्कम मजजवळ उरणार आहे. काय वाईट केलं हो माझं या घरानं ? तें जाऊं द्या... वयाच्या वडीलकीचा फायदा. मी तुम्हांला आशीर्वाद देतो, 'हा वास्तु तुम्हाला सुख-समाधान व समृद्धि देवो !'

शारदाप्रसादची कथा ही अशी आहे. या वास्तुबद्दल माझ्या मनांत असलेली रुखरुख केव्हांच संपलेली आहे. घरमालकावरचा अकारण राग केव्हांच नाहींसा झाला आहे. बंगल्याला काम्पाऊंड वॉल बांधली गेली आहे. आवार स्वच्छ झालें आहे. फुलझाडें, फळझाडें लावलीं आहेत. सभोंवार बंगलाभर फरशी केली गेली असली तरी पाठीमागें तुळसी वृंदावनासमोरचे कांहीं अंगण सडारांगोळीकरतां तसेच बिन फरशीचें ठेवलेलें आहे. बंगल्यांतली फुलें देवपूजेसाठीं चार घरें पलीकडे मावशीच्या घरी जात आहेत. बेबी याच घरांत लहानाची मोठी झाली आहे. ज्या खोलींत ती अपघातांतून शुद्धीवर आली तीच खोली तिला मिळाली आहे. 'सुशे भाजी कसली केलीस ग ? म्हणून आक्का स्वतःच्या बंगल्यांत बसून बहिणीस विचारीत आहे आणि 'भाजी नाहीं, शेंगाचं पिठलं' म्हणून सुशी स्वतःच्या बंगल्यांतून अक्काला उत्तर देत आहे. दादा आले तर अक्काकडें झोपतात. सुशीकडे जेवतात. आक्काकडे जेवतात. सुशीकडे आंघोळ करतात.

परंतु हें सारं योगायोगानं झालं आहे. या मागें कुठलाहि हट्ट नाहीं. कुठलीहि जिद्द नाहीं. कुणाचाहि आग्रह-अहंकार नाहीं. निय-तीनें हें घडवून आणलें आहे. आयुष्याच्या वर्षानुवर्षांच्या वाटचालींत कांहीं घटना, कांहीं प्रसंग घडत होते. कांहीं सुखाचे, कांहीं दुःखाचे. कांहीं व्यक्ति भेटत होत्या. पुढें जात होत्या, मागे पडत होत्या. प्रवासी झाले गेले विसरून जात होता. पण नियतीचें कार्य चालू होतें. नियतीने साऱ्या व्यक्ति, सारे प्रसंग, साऱ्या घटना एकसूत्र केल्या आणि शारदाप्रसाद उभा केला.











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



*तो निरपराध विद्या तिला दिसूं लागला. निराशेनें भरलेलं त्याचं तें हास्य मालीला बैचेन करूं लागलं. तें उदास हास्य मालीचं काळीज चरचर कापीत होतं. प्रीतीवरील त्याची निष्ठा, मांगल्यावरील त्याची श्रद्धा-सारं सारं विजूनं धुळीला मिळवलेलं होतं—*

# एकटी

—प्रभाकर बिडवे

सकाळपासून समोर जें चाललं होतं तें सारं मालीला विचित्र–भयंकर वाटत होतं !

आतांपर्यंतच्या वीस वर्षांच्या आयुष्यांत तिनं या बाबतींत इतका खोल विचार कधींच केलेला नव्हता. तिला तशी आवश्यकताहि वाटली नाहीं. हें सारं असं असतं आणि तें प्रत्येकाचं असंच होत असतं कीं काय, याची कल्पनाही तिला कधीं शिवलेली नव्हती. पण जस्टिस पुरंदऱ्यांच्या बंगल्यांत सकाळपासून जें चाललं होतं आणि ती जें जें पहात होती. तें तें सारं तिला अनपेक्षित होतं. अकल्पित होतं आणि कांहींसं अनाकलनीय होतं.

तसं पाहिलं तर अनेक मित्र–मैत्रिणींच्या लग्न-समारंभाला माली हजर राहिलेली होती. आजचा हा लग्नसोहळा ती नव्यानं पहात होती अशांतला प्रकार मुळींच नव्हता. त्या समारंभांत नेहमीपेक्षां निराळं असं कांहींच नव्हतं, नाविन्य नव्हतं, वैचित्र्य नव्हतं; तर नेहमीच दिसणारा तोच--तोचपणा तिथं होता. तोच मंडप, तीच वेदी, तीच आरास, तशीच मंडळी, त्याच गप्पा गोष्टी–सर्व कांहीं तेंच होतं आणि इतकं सारं असूनही मालीला चाललेलं सारं कांहीं कांहींतरीच चाललं आहे असं वाटत होतं.

लग्नाला न गेलं तर विजू काय म्हणेल आणि 'अनेक अडचणी असतांनाही आपण तुझ्या लग्नाला आलों आहोंत' हें सांगितलं तर ती काय म्हणेल याचा उलटसुलट विचार करीतच माली सकाळीं मुंबईहून पुण्यांत दाखल झाली होती. विजूवर असलेल्या तिच्या प्रेमानं तिला खेचून आणलेली होती- विजू ही कोणी तरी असामान्य मुलगी आहे, असाच तिचा पूर्वींपासूनचा समज होता आणि म्हणूनच या असामान्य पोरीच्या असामान्य लग्नाला हजर रहाण्याचं औचित्य तिनं दाखविलं होतं. कुमारी विजया पुरंदरेची सौभाग्यवती मृणाल शहाणे झालेली पहाण्यासाठी ती केवढ्यातरी उल्हासानें आलेली होती, पण तो सारा उल्हास, सारा आनंद सकाळपासून आतांपर्यंत कणाकणानं कमी होत गेलेला होता आणि त्याची जागा वैष्यम्यानं, निराशनं आणि कांहींशा भयानं घेतलेली होती.

सकाळीं स्टेशनवर स्वागतासाठीं आलेल्या त्याच सगळ्या मुली तिच्या भोंवतीं होत्या. लग्न मंडपात आल्यावर गाद्यागिरद्यांत तक्क्याला टेकून लोळणारी वयस्क मंडळी अजूनही तशीच त्या ठिकाणीं पानांचे पिडे चघळत लोळत पडलेली होती. कडक इस्तरीच्या सुटाबुटांत वावरणारी तिच्याच वयाचीं मुलं अजूनही मांडवांत इकडून तिकडे





अनुक्रमणिका

उगीचच येरझारा घालीत होती. विवाहित स्त्रियांची गडबड निरनिराळे स्वरूप घेत अजूनही चाललेली होतीच. सकाळपासून सक्त ताकीद देऊन ठेवलेली बालसेना मात्र केळीच्या खुंटाचें खोपट काढण्यांत गुंतलेली होती; पण या सर्वांत मालीला मात्र केवढा तरी बदल झालेला वाटत होता. मुलींची तीच किलबिल, तेच खलबत्त्यांचे आवाज, मुलांच्या त्याच उथळ कोट्या आणि हंशा, स्वयंपाक घरांतल्या नेहमीच्याच चर्चा—सारं कांहीं तेंच होतं; तरीपण मालीला या सर्वांबद्दल उबग आलेला होता, घृणा आलेली होती. त्या सर्वांतून कुठंतरी दूर जाऊन बसावं, असं तिला वाटत होतं. सकाळपासून तिंनं जें पाहिलं होतं, जें अनुभवलं होतं, ते सारंच किती तरी हिडीस—कितीतरी ओंगळ—कितीतरी घाणेरडं आहे, असं तिला वाटत होतं.

सायंकाळ होत आली तरी कुठल्याच गोष्टींत अजून खंड पडला नव्हता. एक एक विधि उरकले जात होते. मंडळींची संख्या कमी जास्त होत होती. मंडप दिव्यांच्या झगझगाटांत जणूं फुलून गेला होता. सारा बंगला उजळून निघालेला होता. बंगल्याच्या दारांत रस्त्यावर बत्त्या डोक्यावर घेणाऱ्या स्त्री-पुरुषांची एकच गर्दी झाली होती. पेटवलेल्या गॅस बत्त्या, झुंबरे, हंड्या-तोरणें सारी तयारी सज्ज झाली होती. अजून सजवलेली मोटार मात्र आलेली नव्हती. वरातीचा शेवटचा कार्यक्रम अजून शिल्लक राहिलेला होता, तेवढा झाला म्हणजे विजूच्या लग्नाचा शेवटचा अंक संपणार होता, दिवसभर चाललेल्या सर्व प्रकारावर शेवटचा पडदा पडणर होता. विजूच्या मंगल लग्नाचा सोहळा संपणार होता.

‘ मिस् मालती गुप्ते, जरा त्या पेटीवरून उठतां का ? तिच्यांतला माझा कोट काढून घ्यायचाय् मला ! गारठा सुटण्याची चिन्हं दिसतायत्. तुम्हाला नाहीं वाटत ?’

तोच आवाज तिंनं सकाळपासून सारखा ऐकला होता आणि तीच व्यक्ति तिंनं अनेक वेळां पाहिली होती. सारेजण श्यामा म्हणून त्याला हाका मारीत होते. त्या श्याम्याची तिला शिसारी आली होती. आपले सगळे गुण त्यानं एका दिवसांत उधळलेले होते. सकाळीं गाडींतून उतरल्याबरोबर त्यानंच मालीपुढं शेकहँडसाठीं हात केला होता. त्यानंच बंगल्यापर्यंत मोटार चालविली होती. मंडपांत चालणाऱ्या उथळ कोटया आणि सातमजली हंशा त्याचाच चालला होता. दुपारीं मुलींच्या पंक्तींत वाढण्याचं काम त्यानंच केलं होतं. आग्रह करून लाडू वाढतांना मुलींचे हात धरून पानांत लाडू टाकण्याचा निर्लज्जपणा त्यानंच केला होता. विजूचं लग्न लागल्यानंतर फुलांचे गोटे बायकांत वाटतांना त्यानंच मधून मधून कुणाला तरी धक्के दिलेले होते. एखाद्या मुलीच्या पायावर मुद्दाम पाय देऊन संभावितपणें ‘ सॉरी ’ म्हणण्याचा हलकटपणा त्यानंच केला होता आणि धांदलीत वावरत असतांना एखाद्या सुंदर मुलीला मुद्दाम घसटून जायलाहि त्यानं कमी केलेलं नव्हतं. तोच श्यामा आतां पुन्हा तिच्याशीं बोलत होता.

माली ताडकन् उठली.

‘ नाहीं म्हणजे—कोट काढून घेतल्यावर हवं तर बसा पुन्हां ! राग आला का माझा तुम्हांला.’ सराइतासारखा श्यामा बोलला.

एक खाड्कन् मुस्कटांत भडकावून द्यावी, असं मालीला वाटलं. पण ती नुसतीच दांतओठ खात तशींच बाहेर आली.










अनुक्रमणिका

मंडपांत गाद्यागिरद्यांत तेच म्हातारे पान कुटीत बसलेले होते. त्यांच्याच जिभा दिवसभर बेताल बडबडत होत्या चाललेल्या लग्नापेक्षां होणाऱ्या लग्नांचीच त्यांची सारी चर्चा चाललेली होती. कोण लावण्यखनी, कोण रूपगर्विता, कोण मदनाचा पुतळा, यांचीं वर्णनें मिटक्या मारीत चाललेलीं होतीं. कुणाला कोण अनुरूप आहे, त्यांच्या जोड्या ठरविल्या जात होत्या. कुणाला गौरपणांत, कुणाला काळेपणांत, कुणाला डोळ्यांत, कुणाला नाकांत, तर कुणाला जिवणींत सौंदर्याचा साक्षात्कार झालेला होता आणि नुसत्या सौंदर्याच्या शोधांत त्यांच्या आशाळभूत नजरा दिवसभर धावलेल्या होत्या.

एकानं तर मालीला बोलावून घेऊन तिची चौकशी केली होती आणि आतां 'बार कधी उडवायचा ?' असा चक्क प्रश्नच विचारला होता आणि 'आमच्याकडे एक स्थळ आहे तुम्हाला साजेसं!' अशी जाहिरातही त्यानें केली होती.

त्यांच्या या सूचनेला सर्व वयोवृद्धांनीं दात नसलेल्या थोबाडांनीं हँ हँ हँ करून अनुमति दिली होती.

सर्वांसाठीं एक झणझणीत उत्तर द्यावं असं तिला वाटलं होतं. पण त्यांचा वयोवृद्धपणा, त्यांचा जगाचा अनुभव, त्यांचं ज्ञान, त्यांचा अधिकार या साऱ्या गोष्टींची काल्पनिक आवरणं तिच्या मनावर चढलेली होती आणि म्हणूनच अवाक्षरही न बोलतां ती त्यांच्यापासून निघून गेली होती.

तेच सारे म्हातारे ती खोलीबाहेर येताच एकसमयावच्छेदेंकरून तिच्याकडे पहायला लागले होते.

तिला चीड आली. तो हलकट श्यामा आणि हे सारे म्हातारे मालीला एकाच जातीचे दिसायला लागले. बघतां बघतां त्या म्हाताऱ्यांच्या जागीं तिला सगळे श्यामच दिसायला लागले आणि प्रत्येकजण 'माझा राग आला का तुम्हाला ?' असं विचारीत आहे, असं तिला वाटायला लागलं आणि दात नसलेल्या थोबाडानं म्हातारा श्यामा हँ हँ हँ करून सुचविलेल्या स्थळाच्या जाहिरातीला अनुमति देत आहे, असं तिला वाटायला लागलं.

'पुरुष जात तेवढी एकच ! नीच–हलकट–बदमाश ! !' असाही तिचा समज झाला.



'अहो, एवढी भेट सौ. शहाण्यांकडे पोचवाल का ?'

मालीनं बोलणाऱ्या गृहस्थाकडं पाहिलं. कसलंतरी पुस्तक तो तिला देऊं इच्छित होता. तिनं त्यालाच दुपारी विजूशीं बोलतांना पाहिलेलं होतं.

'तुमचं नांव काय ?' असं विचारीतच मालीनं तें पुस्तक त्याच्या हातून घेतलं

'विद्याधर देशमुख', त्यानं हंसत हंसत सांगितलं आणि तो निघून गेलाही.

मालीच्या डोक्यांत लख्कन् प्रकाश पडला. ती एकदम शुद्धीवर आली. 'हाच तो विद्या' असं म्हणत तिनं पुस्तक उघडलं. पहिल्याच पानावर लिहिलं होतं—

'प्रिय जया,

जीवनांत हव्या त्या व्यक्तीचं पूजन कर, पण तिच्या मांगल्य आणि प्रीतीशी कधींही प्रतारणा करूं नकोस; कारण तो व्यभिचार आहे.

—'विद्या.'

याच गृहस्थाविषयीं मालीनं आज खूप ऐकलं होतं कीं ज्याच्याविषयीं विजूनं तिला कधीं पत्ताही लागू दिला नव्हता. सकाळीं बाथरूममध्यें स्नान करीत असतां बाहेर चाललेलं बोलणं परत तिच्या कानांत घुमूं लागलं. तेच शब्द, सारं फिरून तेंच !

'अगऽ कसलं प्रेम अन् काय ? सगळा पैसा बोलतो आहे.'

'नुसता पैसाच नाहीं बाईसाहेब, आणखीन निराळीच एक भानगड आहे.'

'मिस्टर शहाण्यांचं आणि विजयाचं कधींपासूनच जमलं होतं म्हणतात, आणि कुणाशीं बोलायचं नाहीं–विजूला दिवसही गेलेत वाटतं त्यांच्यापासून ! 'आपल्याला काय करायचंय म्हणा ! !'

'तेव्हांच तर बाईसाहेब शहाण्यांशीं लग्नाला तयार झाल्या. नाहींतर विद्या देशमुख, त्याच्यावर केवढं प्रेम होतं तिचं !'

अहो, सगळं नाटक ! बिचाऱ्याचं मात्र वाटोळं झालं यांत ! जीव टाकीत होता तिच्यासाठीं तो ! !'

अन् आता तर म्हणे लग्नच करणार नाहीं तो ! '

शरीरांतलं सगळं रक्त डोक्याकडं धावत आहे असं मालीला वाटूं लागलं. तो निरपराध विद्या तिला दिसूं लागला. निराशेनं भरलेलें त्याचं तें हास्य मालीला बेचैन करूं लागलं. तें उदास हास्य मालीचं काळीज चर्‌चर् कापीत होतं. प्रीतीवरील त्याची निष्ठा, मांगल्यावरील त्याची श्रद्धा–सारं सारं विजूनं धुळीला मिळवलेलं होतं–राखरांगोळी केली होती. त्याची प्रतारणा करून ती व्यभिचारिणी ठरली होती.

माली तशीच विजूकडं गेली. मिस्टर आणि मिसेस शहाणे एकांतांत गप्पांत रंगलेले होते. माली येतांच विजू चटकन् उभी राहिली.

'विद्यानं ही भेट तुला दिली आहे ' माली.

'त्याचा कविता संग्रह असेल तो. वाचलाय मी. राहूं दे तुझ्याच ! ' सौ. शहाणे बोलून गेल्या.

काय करावं आणि काय नाहीं असं मालीला होऊन गेलं होतं. कु. विजया पुरंदरे आणि सौ. मृणाल शहाणे यांच्यांत केवढा फरक तिला दिसत होता. ती असामान्य वाटणारी मुलगी विजू–तिचं असामा-




न्यत्व म्हणजे अखेर मालीनं मनावर चढवून घेतलेलं काल्पनिक आवरण ठरलं होतं. जातिवंत प्रेमाची, निष्ठावंत मनाची प्रतारणा करणारी ती एक व्यभिचारिणी स्त्री होती. मोहाला बळी पडलेली, वासनेंत वहावलेली, नीतीपासून ढळलेली अशी ती एक कलंकित कुलटा होती. मनानं मेलेली, विचारानें वठलेली, भावनेनं गोठलेली, ती एक पतिता होती.

हीच सौ. शहाणे दुपारी त्याच विद्याला अजूनही आशेनं बांधू पहात असतांना मालीला दिसली होती. 'लग्न झालं तरी माझं उदात्त प्रेम तुझ्यावरच राहील' असं डोळ्यांत अश्रू आणून सांगण्याचा ढोंगीपणा तिनं केला होता. केवढी ही मनाची वंचना! मालीला तिची कींव आली, किळस आली, दुर्गंधी आली. तिच्या तोंडावर थुंकावं अन् चालायला लागावं असं तिला वाटलं.

ती तशीच पुन्हां बाहेर मंडपांत आली.

सकाळच्याच सगळ्या मुली अजूनही धिंगाणा घालीत होत्या, धांवत होत्या, खिदळत होत्या, त्यांना स्वतःचं भान नव्हतं, लग्नघराचं भान नव्हतं, पुरुष मंडळी जवळ असल्याची जाणीव नव्हती. मालीला पहातांच त्यांच्यांत जराशी शांतता आली.

'नवरा-बायकोमध्यें तिसऱ्यानें जाऊं नये म्हटलं-'

'अगऽ,अजून तिला त्याचा अनुभव नाहीं. अनुभवानं पटेल सारं तिला'-

'आऽहा! जसा कांहीं तिला अनुभव नसेल वाटतं. तिनं पकडला असेल की कुणीतरी एखादा मुंबईचा.........'

—आणि यावर सगळ्या फिदिफिदी हंसल्या.

मालीला आतां त्यांच्या असल्या बडबडण्याचें कांहींच वाटेनासं झालं होतं. साऱ्याच मुली तिला विजूसारख्या दिसायला लागल्या होत्या. 'लग्नाचा मांडव म्हणजे नवं प्रेम जमण्याची जागा' असं जिनं दुपारी म्हटलं होतं ती नंदा, 'एक दिवस का होईना पण नव्या पुरुषांचा सहवास उपभोगायला मिळतो तो लग्न-मंडपांतच' असं सांगणारी शैला, श्यामानं खुशाल वेणी ओढली तरी नुसती मिस्किलपणानं हंसणारी प्रमिला, आपल्याशीं कुणीतरी प्रेमानं बोलावं असं वाटणारी आणि आधाळभूतपणानं पुरुषांचे चेहरे न्याहाळण्यांत दिवसभर गुंतलेली तारा, विद्याला नेभळट, भित्री, दरिद्री ठरविणारी पुष्पा साऱ्याच तिला हंसत होत्या आणि मालीला ती नंदा, ती शैला, ती प्रमिला, ती तारा, ती पुष्पा आणि सौ. शहाणे यांच्यांत कसलाच फरक वाटेनासा झाला. साऱ्या व्यभिचारिणी! साऱ्या कुलटा! साऱ्या पतिता!!

सारा लग्नमंडप आपल्याभोवतीं गरगर फिरत आहे असं तिला आतां वाटायला लागलं होतं. तिनं जें जें आपल्या कल्पनेंत अनुभवलं होतं, ज्याची बीजं तिच्या हृदयांत रुजून त्यांचा हळूहळू विस्तार व्हायला लागला होता, ज्यांच्या मागं तिच्या साऱ्या जीवनाची सारी धार होती, तें सारं इथं उध्वस्थ झालेलं होतं, त्याचा चुराडा झालेला होता, त्याची धूळ झाली होती. तिच्या विचाराला, कल्पनेला, भावनेला प्रचंड धक्के बसत होते. चाललं होतं ते सारं अकल्पित, अनाकलनीय वाटत होतं. तिनं तें यापूर्वी कधीं पाहिलेलं नव्हतं, ऐकलेलं नव्हतं, अनुभवलेलं नव्हतं आणि म्हणूनच तें सारं विचित्र होतं, विक्षिप्त होतं अन भयंकर होतं.

सारी अनीति, सारा व्यभिचार, सारी पतितता त्या मांडवांत गोंडस नांवानं वावरतांना तिला दिसत होती. सुधारकीपणा, पुरोगामीपणा, मॉडरेटपणा, नवमतवादित्व या नांवाखालीं सारी कृत्यें चाललेली होतीं. सुशिक्षितांनीं संमत केलेला सारा मूर्तिमंत अनाचार त्या मांडवाखालीं मोकाट सुटलेला होता. आणि त्या अनाचाराचें कौतुक तो श्यामा, ते भेरडे, ती सौ. मृणाल शहाणे, त्या नंदा, शैला, प्रमिला, तारा, पुष्पा हे सारे मिळून करीत होते. माणूस जीवन जगतो तें सारे असंच असतं, असाच त्या साऱ्यांतून अर्थ निघत होता.

आणि म्हणून मग ती वेदी, त्या अक्षता, तो हार, ती मंगलाष्टकं, तीं मंगलवाद्यें ही सारीच मालीला भयानक वाटूं लागली. ज्या एका क्षणाला स्त्री-पुरुष आपल्या जीवनाला सबंध नवं वळण द्यायला तयार होतात, तो क्षण--तो एकच क्षण--तो आयुष्यांत पहिल्यानंच आणि शेवटचाच येणारा तो क्षण-त्याची निर्मिति अशा अनाचारी, व्यभिचारी, पतित पण संभावित म्हणून समजल्या जाणाऱ्या, प्रतिष्ठितपणाचे मुखवटे घालणाऱ्या माणसांनीं करावी आणि त्याला लग्न म्हणून संमति द्यावी— त्या लग्नसंस्काराविषयींच मालीला भयानकता वाटूं लागली.

आपल्या हृदयांत आपण बाळगलेल्या जीवनविषयक कल्पना या सगळ्यांच्या दृष्टीनं अर्थशून्य बडबड आहे, असं तिला वाटायला लागलं. आपण एका मृगजळाच्या मागं तर धावत नाहीं ना? असा तिला एक संभ्रम निर्माण झाला. विद्या अशाच मृगजळांत फसला असला पाहिजे असंही तिला वाटूं लागलं. आपण खेळत आहोंत तो उन्ह-सावलीचा खेळ तर नाहींना? तिला कांहींच कळेना.

संभावितपणें मुखवटे घालून जे जगतात त्यांचंच खरं जीवन कीं आपण आणि विद्या जें जीवन जगूं पहात आहोंत तें खरं जीवन. मालीची विचारशक्ति खूप ताणली गेली. दोन परस्परविरोधी जीवनांचं प्रचंड द्वंद्व तिच्या मस्तकांत कल्लोळ करीत होतं.

त्या मांडवांत ती एकटीच होती. सकाळपासून ती एकटीच वावरत होती आणि आतांही ती एकटीच-अगदीं एकटीच उभी होती.

—आणि सारेजण वरातीसाठीं निघून गेलेले होते!

•••

## रुपसुगंध



जगतास पाहिजे रुपसुगंध फुलाचा
जोंवर तें आहे स्पर्श त्यास हाताचा
तें रुप मावळुन सुगंध निघुनी जातां
पदतळीं चुराडा होतो त्याचा...
शांतीचें झुंबर फुटलें भाळावरती
हे भाळ जगाचें टेकून धारेवरती
तें रक्त वाहतां त्यांतून तळपे कांक्षा
निष्पाप तयांच्या कुडी तयांवर तरती
—दत्ता कदम







अनुक्रमणिका

# लिस्टरीन अॅन्टीसेप्टिक

## तुमच्या रोजच्या संरक्षणाचे प्रतिक

तोंडातल्या ओलाव्यामुळें आणि उष्णते मुळे रोगाचे जंतू उत्पन्न होतात व जेवण झाल्यानंतर दातांमध्ये जे अन्नाचे कण राहतात ते तर जंतूना निमंत्रणच देतात. तेव्हां एक चांगले अॅन्टीसेप्टिक द्रव जंतूचा नाश करून तोंड व जीभ स्वच्छ ठेवतें: लिस्टरीन हें एक उत्तम अॅन्टीसेप्टिक असल्याने तें तोंड स्वच्छ ठेवतें. सुखी जीवनासाठी लिस्टरीन अॅन्टीसेप्टिकचा उपयोग करणे आवश्यक आहे.



लिस्टरीन वापरण्याने सर्दी खोकला अगर गळ्याची दुखणी होत नाहींत हें सिद्ध झालें आहे. आपली प्रकृति उत्तम ठेवण्यासाठीं लिस्टरीन अॅन्टीसेप्टिकच्या रोज दोनदा गुळण्या करणे जरूर आहे. सुखी जीवनासाठी लिस्टरीन अॅन्टीसेप्टिकचा रोज उपयोग करणे आवश्यक आहे.






रोज जेवणानंतर लिस्टरीनच्या गुळण्या केल्यानें तोंड तर स्वच्छ होईलच आणि श्वासही स्वच्छ बनेल. पान तंबाखू खाणाऱ्यांना लिस्टरीन अॅन्टीसेप्टिकच्या गुळण्या करणें अतिशय आवश्यक आहे. तें वापरल्याने तोंड आणि दांत स्वच्छ राहील सुखी जीवनासाठी लिस्टरीन अॅन्टीसेप्टिकचा उपयोग करणे आवश्यक आहे.

तोंडातील जंतू नष्ट करण्यासाठीं लिस्टरीन अॅन्टीसेप्टिकच्या गुळण्याकरण्याची रोज सवय ठेवा. लिस्टरीन अॅन्टीसेप्टिक एक अत्यंत उपयोगी आणि खात्रीचें अॅन्टीसेप्टिक आहे. आजपासूनच आपल्या कुटुंबातील माणसांना लिस्टरीन अॅन्टीसेप्टिक द्वारा संरक्षण द्या. लिस्टरीन अॅन्टीसेप्टिक ३, ७, अगर १४ औसांच्या बाटल्यांमधून मिळूं शकेल

**रोज लिस्टरीन वापरणे**
**ही एक चांगली सवय आहे...**

**वॉरनर लॅम्बर्ट फार्मास्युटिकल कंपनी**

(निर्मिती दायित्वसहित यु. एॅस. ए. संस्थापित)

WL. 1368 MAR













*प्रत्येक योनीची सारखी उत्क्रांति होत आहे. शास्त्रज्ञांचं असं मत आहे. मला तें प्रमाण आहे. माझ्यांतहि अशी उत्क्रांति झालेली आहे आणि म्हणूनच हें थोडेसें आत्मकथन...*

गो. वि. वैद्य

दोन जिभा असल्या तरी जी सर्पिणी नाहीं, ती लेखणी, अशी लेखणीची एक संस्कृत व्याख्या आहे. 'द्विजिव्हा नव सर्पिणी.' माझा परिचय तुम्हाला करून देताना मला या व्याख्येची आठवण होते याचं कारण म्हणंजे माझी स्वतःचीच एक व्याख्या आहे. जिला दोन तोंडे असतात तिला तुम्ही दुतोंडी म्हणता. मला दोन तोंडे आहेत. पण मी खरोखरी दुतोंडी नाहीं. उलट दुतोंडी स्त्रीच्या हातून जें कटु कर्म घडतें त्याच्या अगदीं उलट असें माझें सेवेचें कर्तव्य आहे.

तुम्हाला कदाचित आत्मश्लाघेचा प्रकार वाटेल; पण माझी ओळख मी स्वतःच करून देत असल्यामुळें मला सत्य मोकळेपणानें सांगितलें पाहिजे. मानवजातीच्या वर्धनाचे महान् कार्य मी करीत असते. प्रत्येक बालकाचें सर्वस्व म्हणजे त्याची माता. पण मातेनंतर जर त्याला कोणाची गरज लागत असेल तर ती माझी. 'बाई आणि बाटली' हे दोन शब्द तरुण मंडळीच्या बाबतींत ज्या अर्थानें वापरले जातात त्याच्या अगदीं उलट स्वरूपाच्या अर्थानें ते बालकांच्या बाबतींत लागू पडतात. आई अर्भकाला अंगावर धेऊ न लागली तर त्याला वरचें दूध द्यावें लागतें. म्हणजेच बाई आपलें कर्तव्य बजावीनाशीं झाली कीं तें बाटलीला पार पाडणें भाग पडतें. माय मेल्यावर मावशी मुलाचें पालन ममतेने करते. कित्येक प्रसंगीं मी ही मावशीची कामगिरीहि बजावते.

पण अलीकडे मला मावशीच्या ऐवजीं खुद्द मातेचें काम प्रथमपासून करावें लागतें. शहरांतील स्त्रिया, शिकलेल्या बायका, नोकरी करणाऱ्या महिला अगदीं पहिल्यापासूनच मला त्यांच्या मुलांच्या मुखाना लावतात. सेवेचें व्रत घेतलेली मी; खंत कशाला करूं त्याची? तथापि बदली कारकुनाच्या अंगावरच सगळें काम एकदम सोपविल्यासारखें नाहीं कां होत यामुळें?

मूळचे आम्ही राहणारे पश्चिमेकडचे. प्राचीनकाळीं आमचे पूर्वज युरोपांत स्थायिक होते असं म्हणतात. आर्य लोक ज्याप्रमाणें हिंडत, फिरत मध्य आशियात व त्यानंतर हिमालयाच्या दक्षिणेस आले; त्याप्रमाणें आमचेहि पूर्वज भारतात, महाराष्ट्रांत येऊन स्थायिक झाले. नाहींतरी पश्चिमेकडून वारे वाहातच होते त्यावेळीं.

महाराष्ट्रांत आम्ही केव्हां आलों; कसे स्थायिक झालों आणि मिशनऱ्यांप्रमाणें आम्ही सेवाधर्मास केव्हां सुरवात केली ते यथाकाल इतिहास संशोधक प्रकाशात आणतीलच. लवकरच आमचाहि कुलवृत्तांत प्रसिद्ध व्हायचा आहेच. त्यांतूनहि पुष्कळशी माहिती कळेलच. एक मात्र माझ्या ऐकिवात आहे कीं माझे पूर्वज जेव्हां महाराष्ट्रांत आले तेव्हां आमचं आडनांव 'बोंडले' असें होतें. ज्या भूमींत गोखल्यांचे रास्ते झाले तेथेंच कालांतरानें बोंडल्याचेहि 'बाटले' झालें. हें नामांतर चालू शतकाच्या सुरवातीस झालें असें सांगतात.

मनुष्याचा पूर्वज माकड आहे असं मी ऐकते. प्रत्येक योनीची सारखी उत्क्रांति होत असते असं शास्त्रज्ञांचं मतहि माझ्या कानावरून गेलं आहे. तें मी प्रमाण मानतें. कारण तशीच उत्क्रांति आमच्याहि बाबतीत झाली आहे; होत आहे.

आमच्यात एका नव्या जातीच्या बाटल्यांचा जन्म झाल्याचें युद्धकालापासून आढळून आलें. त्यावेळीं एकाच तोंडाच्या बाटल्यांचा जन्म झाला. सप्तसमुद्राच्या मंथनानें चांगल्या व त्याचबरोबर वाईट गोष्टींहि उपलब्ध झाल्या. त्याचप्रमाणें युद्धकालाचे परिणाम म्हणून जसं रेशनिंग, काळाबाजार व रांगा इत्यादि अवतीर्ण झाल्या त्याचप्रमाणें दुधाच्या एकमुखी बाटल्यांचाहि अवतार जन्मास आला. त्यांच्यापैकींच मी एक.

तुमच्या परिचारिकांप्रमाणें आम्ही नेहमीच पांढरा, स्वच्छ पोषाख करतो. आपाद–मस्तक शुभ्र असतो आम्ही. परिचारिकांप्रमाणें आम्हीहि टोपी वापरतो, ती रुपयाच्या आकाराची असते. (चांदीचा रुपया माहीत आहे ना तुम्हाला? कीं विसरलात एवढ्यातच?) युद्धामुळें जीवनमूल्यें बदलतात हें तुम्हां मानवांच्या जीवनांत आढळून येणारें सत्य आमच्याहि बाबतींत लागूं पडूं लागलें आहे. मोठ्या व लहान, निःसत्व व सत्वपूर्ण दुधाच्या, अशा जाती आमच्यांत निर्माण झाल्या आहेत. आमची विक्रीहि केली जाते! आणि आता आम्ही फक्त लहान मुलांचीच सेवा करतो असें नाही, तर समस्त आबालवृद्धांच्या उपयोगी पडतो.

या सेवाधर्माला आम्ही अगदीं रामप्रहरात तयार असतों. आम्ही लोकांच्या बरोबर जातो. कोणी कोणी आम्हांला नेण्यासाठी येतात व घेऊन जातात; तर आमच्यापैकीं कांहींजणी आपणहून लोकांच्या घरीं जातात. अर्थात् त्यासाठी त्या भत्ताहि आकारतात. आजकाल चहा आणि कप या जातीच्या दोन पदार्थांशी एकसारखें साहचर्य आणि दृढ सहकार्य आम्हांला करावें लागतें.

पण कधीं कोणाच्या वाट्याला न येणारं एका विचित्र स्वरूपाचं जीवन आमच्या वाट्याला आलेलं आहे! रोज आम्हांला नव्या घरीं जावं लागतं हो. आमचं सासर रोज बदलतं! माहेर अर्थातच कायम असतं. माझी सुखदुखं जरा मोकळेपणानें सांगूं का? म्हणजे कदाचित् मानवजातीची तुम्ही मंडळी आम्हांला जरा प्रेमळपणानें वागवाल. आमच्या









अनुक्रमणिका

माहेरी आम्हाला अगदीं अक्षरशः यांत्रिक तऱ्हेनें वागविलं जातं आणि म्हणून सासरी तरी जरा माणुसकीची वागणूक मिळावी अशी सहाजिक अपेक्षा आम्हांला वाटतें. पण आतां घरोघर मातीच्याच चुली आढळत नाहीत ! कोणीकोणी आम्हांला मुळींच स्वच्छ ठेवीत नाहीत; धूतदेखील नाहींत. पूर्वकालीन अस्पर्श सौ. प्रमाणें एकाद्याच्या घरांत आम्हांला दिवसभर एकाद्या अंधाऱ्या कोपऱ्यांत पडून रहावें लागतें. पण कोणीकोणी आमच्या तोंडाला जेव्हां आपलं तोंड एकदम लावतात तेव्हां कसंसंच होतं. आणि क्वचित उघड्यावरसुद्धा हो. काय सांगावं !

अर्थात् पुष्कळदा याच्या उलटहि अनुभव येतो, नाहीं असं नाहीं. कधीकधी मला स्पर्श करणारे हात माझ्यासारखेच गोरे अन् माझ्या-इतकेच मऊ असतात. त्या हातांनीं वापरलं जाताना मधूनमधून काचेच्या बांगड्यांचा अथवा सुवर्ण कंकणांचा जो मधुर किणकिणाट मला ऐकूं येतो तो जिवाला जणूं गुदगुल्या करतो; मोहरून टाकतो. कांहीं ठिकाणीं मला स्नान घडत नाहीं म्हणून मी आताच तक्रार केली ना ? याच्या उलट कांहीं सुगरण गृहिणी मला साबूनें न्हाऊं घालतात ! आणखी एक सांगूं कां ? नको बाई, संकोच वाटतो. पण मला माहीत आहे कीं आता तुम्ही ते माझ्या-कडून वदवून घेतल्याशिवाय राहणार नाही. पण मी नुसतं सूचित करते. मी 'ता. क.' म्हटलं कीं तुम्ही माझ्या बाबतींत दू. ध. म्हणूनच उमजाल हें मी जाणतें. तेव्हां काय सांगत होते मी कीं काही, दोन खोल्यांच्या संसारांत आणि दोन जीवांच्या विश्वांत मी जेव्हां सकाळच्या अगदी पहिल्या प्रहरांत माझा सेवाधर्म सुरू करते तेव्हां खोलीच्या कोपऱ्यांत बसूनहि कांही तरी गंमतजंमत माझ्या नजरेस पडते. रात्रभर चाललेल्या श्रृंगारगायनाच्या बैठकींतील अखेरच्या भैरवीच्या उरल्यासरल्या कांही ताना हीं नवयुग्में घेत असतात ना हो त्या रामप्रहरांत !

कसंहि असो. आजकाल शहरांत मनुष्य-जातीला आमचा उपयोग अगदीं सकाळींच उठल्या बरोबर होतो; आमच्या सहकार्यामुळें त्यांना आपल्या दिनचर्येच्या प्रारंभासाठीं उत्साह वाटतो एवढी कामगिरीसुद्धां आमच्या सारख्यांच्या जीवनाचं सार्थक करते असं मला आपलं वाटत झालं. मानव जातीच्या या सेवे-बद्दल आमच्यासारख्या दुधबाटल्यांना इतकं समाधान मानता आलं तर त्याबद्दल धन्यता मानायला मग काय हरकत आहे. • • •

# कुठें गेली ही संपत्ती ?



आजपर्यंत कुणाहि इतिहासकारानें शहाजहाँ बादशहाच्या खजिन्याचा अंदाज व्यक्त केलेला नाहीं. असं म्हणतात कीं फ्रांस आणि इराण या दोन देशांच्या खजिन्यांत जेवढी संपत्ति आज असेल त्याहून जास्त संपत्ती शहाजहाँच्या खजिन्यांत होती. त्याच्या रत्नभांडारांत इतकीं अमाप रत्नं होती कीं एकदां त्याच्या अर्थमंत्र्यानें त्याला विनंती केली कीं बादशहा या खजिन्याच्या भिंती तोडून त्या अधिक लांबरुंद करावयास हव्यात.'

हें ऐकतांच बादशहानें 'मयूर-सिंहासन' तयार करावयास हुकूम दिला. त्या सिंहासनाची तेव्हांची किंमत त्रेपन्न कोटी रुपये होती. एक इतिहासकार म्हणतो कीं 'मयूर-सिंहासनाचा' हुकूम झाल्याबरोबर मोठमोठ्या मापाचीं माणकं, रत्नमणी, मोती, हिरे, पाचू वगैरे सात मण वजनाचीं, तसंच ३५ मण वजनाचं सोनं सुवर्णकाराच्या ताब्यांत दिलं.' राज्यांतील अत्यंत हुशार अशा कारागिरांनीं तें सात वर्षांत तयार केलं.

शहाजहानें आपल्या कारकिर्दींत पुष्कळ मोठमोठ्या इमारती बांधल्या. तसेंच तो स्वतःहि मोठ्या इतमामानें रहात असे. जेव्हां औरंगजेबानें त्याला सिंहासनावरून खालीं उतरवला तेव्हां–तो नुकतांच राज्य करूं लागला तेव्हांपेक्षांहि जास्त संपत्ती होती.

'जवळ जवळ ऐंशीं रत्तल हिरे (अंदाजे ५० लाख कॅरट), माणकं शंभर रत्तल, पाचू शंभर रत्तल तसेंच मोतीं ६०० रत्तल होतीं. याशिवाय लहानमोठी रत्नं इतकीं अगणित होती कीं त्यांची गणती करणं अशक्य!

त्याच्या शस्त्रागारामध्यें दोन हजार तलवारी अशा होत्या कीं ज्याच्या मुठीवर हिरे बसविले होते. दरबारांत निव्वळ चांदीच्या १०३ खुर्च्या होत्या आणि नक्त सोन्याच्या पांच खुर्च्या होत्या. याशिवाय राजकुमारांसाठीं दोन सोन्याचीं व तीन चांदीचीं सिंहासनं बसविलीं होतीं. तसेंच मयूर सिंहासनाशिवाय बहुमुल्य हिऱ्यांनीं युक्त अशीं सात सोन्याची सिंहासनें होतीं. त्याच्या आंघोळ करण्याच्या टबाची किंमत आजच्या बाजारांत दहा अब्ज रुपये होईल. सात फूट लांब आणि पांच फूट रुंद अशा त्या टबवर हिऱ्यांचं काम असं अप्रतीम झालं होतं कीं त्यावर नजर स्थिर होत नसे.

त्याच्या महालांत २५ टन (अंदाजे ७०० मण) सोन्याचीं भांडीं होतीं. तसेंच ५० टन चांदीचे चाकू-सुऱ्या वगैरे सामान होतं. प्रत्येक वस्तूवर शाही मोहोर होती.

बादशहाच्या कपड्यांची किंमत १ कोटी रुपयांहून जास्त होती. आणि २५ लाखाहून अधिक किंमतीची चिनी मातीचीं भांडीं होतीं.

या शिवाय राजवाड्यांतील महत्वाची गोष्ट म्हणजे पुस्तकालय. त्यांत २४ हजार हस्तलिखित ग्रंथ होते. त्यावेळीं पुस्तकं स्वस्त नव्हती म्हणून त्या ग्रंथालयाची किंमत १ कोटी रुपये होती.

हे सर्व आकडे १७व्या शतकांतले आहेत. त्यापेक्षां आज रुपयाची किंमत कितीतरी पटानें वाढलेली आहे.

या संपत्तीची तुलना ब्रिटिश राणीच्या संपत्तीशीं करणें उचित होईल. फेब्रुवारी १९५२ मध्यें ब्रिटिश राणीची संपत्ती १५ कोटी डॉलर (अंदाजें ७५ कोटी रुपये) च्या आसपास होती. शहाजहानची संपत्ती याहून निश्चित कमी नव्हती. • • •









अनुक्रमणिका

## आपल्या भविष्यांतील उज्ज्वल तारा!

एक सामान्य ट्रक ड्रायव्हर, पण बाबूलाल मोठा दूरदर्शी! मालकाचाच कित्ता त्यानं पुढं ठेवला. काटकसर करून ट्रक घेण्यापुरते पैसे जमविले आणि लवकरच आपला पहिला टाटा मर्सिडीज बेन्झ ट्रक त्यानं खरेदी केला.

आणि तो त्रिदल शुभतारा बाबूलालच्या आयुष्यांत उगवला, त्या दिवसापासूनच त्याच्या भरभराटीचीं सुचिन्हें दिसूं लागलीं. थोड्याच अवधींत नव्या कॉलनींत बाबूलालचें एक टुमदार घर उभें झालें. मुलांना उत्तम शिक्षण-त्यांच्या प्रकृतीची उत्तम काळजी,—सर्व सुखें त्याच्या पायाशीं खेळूं लागलीं.

आज बाबूलालच्या टी.एम्.बी. ट्रक्सच्या ताफ्यांतून लक्ष्मीचा अविरत वावर चालू आहे. आणि यापुढेंहि अनेक वर्षांनंतर देखील ते त्याच्या मुलांबाळांकरितां अशीच बहुमोल कामगिरी बजावित राहतील.

वाहतुक व्यवसायांतील अधिकाधिक लोक टाटा मर्सिडीज बेन्झ ताऱ्यालाच आज ध्रुवताऱ्याचा मान देऊं लागल्यास त्यांत कांहीं नवल आहे काय?



भाग्यराशीचा तारा

**टाटा**

**मर्सिडीज-बेन्झ**

**टाटा इंजिनिअरींग अँड लोकोमोटिव्ह कंपनी लिमिटेड**

सेल्स ऑफिस: १४८ महात्मा गांधी रोड, मुंबई १.













*त्याच्या मनांत कुठेंतरी आनंदाच्या सूक्ष्म ऊर्मि उठतात. आपल्याला हवं असलेलंच झालं या समाधानानें त्याचा चेहरा उजळून निघतो. त्या आवेशांत तो उठून उभा राहातो; पण एका क्षणानंतर त्याच्या डोळ्यांतून खळकन् आसवं बाहेर पडतात......*



# अ प रा ध

पांच वाजून गेले आहेत. आतां, इतक्यांत गोविंदा येईल. आज संध्याकाळपर्यंत सगळं उरकून जाईल असं डॉक्टरबाई म्हणाल्या होत्या. संध्याकाळ म्हणजे कदाचित् आठहि वाजतील. तोपर्यंत वाट पाहिली पाहिजे. यावेळीं दवाखान्यांत गेलो तर ते आईला आवडणार नाहीं. ती थोड्या जुन्या विचारांची आहे. कशाला बायकांच्यामध्यें चोंबडेपणा करायला आलास, असं ती म्हणेल. यापेक्षां न गेलेलं बरं.

डॉक्टरबाई म्हणाल्या होत्या, मूल अपुऱ्या दिवसांचं होत आहे, त्यामुळें तें बहुधा मेलेलंच निघेल. तसंच व्हायला हवं. अजून मी उणापुरा चोवीस वर्षांचा आहे. सध्याच बाप व्हायची कल्पना कशी-शींच वाटते. माझ्या मित्रांचं अजून लग्नदेखील झालेलं नाहीं. निदान कॉलेजचं शिक्षण संपेपर्यन्त तरी ही भानगड नको. वसुधाला मी आधीच सांगितलं होतं कीं, इतक्या लवकर आपल्याला लग्नासारख्या बंधनांत गोवून आपल्या आई-वडिलांनीं चूक केली, पण आतां आपल्या हातून तरी दुसरी चूक होऊं नये. आपण तरी समजुतदारपणें वागावं. आतांशीच या भानगडींत गुरफटून जीवनांतला 'चार्म' गमवायचा कां ! अजून तूं मॅट्रिकला देखील बसायची आहेस.

तिला तें पटलं. तिनंच साधनं विकत आणलीं. कांहीं दिवस अगदीं सुरळीत चाललं. पण पुढें काय झालं कुणास ठाऊक, तिची मासिक पाळी चुकली. घाबराघुबरा होऊन मी म्हटलं,

'वसुधा, हें कसं झालं ग !'

तर ती हंसून म्हणाली,

'काय मोठं झालं हो ! जगाला होतं, तेंच आपल्याला झालं.'

'अग तसं नाहीं. पण इतक्या लव्कर...'

'तुम्हांला त्रास नाहीं होऊं देणार,' स्वतःच्या शेपट्या ओढीत ती म्हणाली, 'तुम्ही खुशाल बसा एम. ए. च्या परीक्षेला.'





अनुक्रमणिका

' अग पण तुझी मॅट्रीक...'

मधेंच ती म्हणाली,

' मला नाहीं बसायचं मॅट्रीक फॅट्रीकला. किंवा असं करा,' विचार केल्यासारखं करून तीच म्हणाली, ' एक मूल होऊं द्या. दुसरं मूल लवकर होऊं द्यायचं नाहीं. त्या अवधींत मी मॅट्रीक करून घेईन. कसं ? '

' पण...'

' पण काय आणखी ? '

' या वयांत बाप होणें कसंसंच वाटतं ग. अजून मी पुरा चोवीसचा देखील नाही. '

' मग ? ' विचारांत पडल्यासारखा चेहरा करून तिनं विचारलं.

' असं करत्येस कां ? '

' कसं ?'

' शहाणेबाईंकडे जा व एखादा उपाय विचार. म्हणावं, आत्तांशीच आम्हांला मूल नको. '

' पण तें मला आवडत नाहीं. ' ती फुरंगटून म्हणाली.

समजावणीच्या स्वरांत मी म्हटलं,

' त्यांत काय वाईट आहे वसुधा ? अजून पुष्कळ आयुष्य आहे ह्या गोष्टींसाठीं. पुढें आतांचा उत्साह थोडाच रहाणार आहे ? '

ती कांहींच बोलली नाहीं, तेव्हां मींच म्हणालो,

' वसुधा, तू माझं ऐकणार नाहीं आहेस कां ? '

' जाईन. ' थोड्या वेळानें; उदास स्वरांत ती म्हणाली.

' आतां आठ वाजले आहेत, ' घड्याळाकडे पहात मी म्हटलं, ' अजून शहाणेबाईंचा दवाखाना बंद झाला नसेल. '

' तुम्हीही माझ्या सोबत चला. '

' मी कशाला हवा आणखी ? तूच एकटी जा ना. '

' नाहीं. मला नाहीं जमणार असलं कांहीं बोलणं. '

' बरं चल. ' मी म्हटलं.

आम्ही दोघे दवाखान्यांत गेलो. सगळे पेशंटस् उरकल्यावर मी वसुधाला घेऊन तपासण्याच्या खोलींत गेलो. वसुधाला मी बोलण्याची खूण केली, पण ती कांहींच बोलेना. शेवटीं मीच म्हटलं,

' हिला दिवस गेले आहेत बाई...'

' कशावरून ?' हातांतला चष्मा डोळ्यांवर ठेवीत त्यांनीं विचारलं.

' हिची पाळी चुकली आहे. '

' कोणती तारीख होती ? '

' ह्याच महिन्याची सतरा तारीख होती. '

' आजची पंचवीस ', त्या विचार करीत म्हणाल्या, ' पण त्यावरून ह्यांना दिवसच गेले असतील असं नाहीं. '

' कसं ? ' मनांतून आनंदून मी विचारलं.

' कधींकधीं दोन महिने देखील पाळी लांबणीवर पडते. पुनः आपोआप सुरळीत सुरू होते. हवं असल्यास मी ह्यांना इंजेक्शन्स देईन. '

' कशासाठी ? ' न कळल्यामुळें मी विचारलं.

' दिवस गेले नसतील तर मासिक पाळी सुरू होण्यासाठीं. '

' पण दिवस गेले नसतील तर पाळी येईलच की. ' मी चांचरत म्हटलं.

' हो येईलच. '

' मग इंजेक्शन्स...'

' इंजेक्शनसमुळें दिवस गेले आहेत कीं नाहीं तें कळेल. '

' कसं ? ' भाबडेपणानें मी विचारलं.

घड्याळाकडे पहात त्या म्हणाल्या,

' वेगळ्याच बिघाडामुळें मासिक पाळी बंद झाली असल्यास ती इंजेक्शन्समुळें सुरू होईल. '

' आणि खरोखरच दिवस गेले असतील तर ? '

' तर त्याला इलाज नाहीं. '

' पण पुष्कळ लोक गर्भपात करतात ना...'

' हो, करतात. '

' मग ? '

' बाईच्या जीवालाहि धोका निर्माण होतो. '

हतबल होऊन मी म्हटलं,

' मग काय करायचं आतां ? '

त्या उठत म्हणाल्या,

' दोन-तीन इंजेक्शन्स देऊन पाहूं. मासिक पाळी सुरू न झाल्यास दिवस गेले आहेत असं समजायचं व स्वस्थ बसायचं. त्याला इलाज नाहीं. कोणत्याहि तऱ्हेचीं औषधें देण्याचा मुळींच प्रयत्न करूं नका. त्यामुळें गर्भपात तर होणार नाहींच, पण ह्यांची तब्येत मात्र पार बिघडून जाईल. '

'पण ऑपरेशननें सुरक्षित गर्भपात करता येतो असं मी ऐकलं आहे.' मी उग्याउग्याच म्हटलं.

माझ्याकडे रोखून पहात त्या म्हणाल्या,

'इथें तें काम करणारा कुणी डॉक्टर नाहीं. त्यासाठीं तुम्ही मुंबईला गेलं पाहिजे. जवळ जवळ दीड हजार खर्च येईल. शिवाय ओळखीशिवाय तुमचं काम होईलसं वाटत नाही.' इतकं म्हणून त्या रूमच्या बाहेर पडल्या.

दीड हजाराचा खर्च माझ्या आवाक्याबाहेरचा होता. मुकाट्यानें दुसऱ्या दिवशीं वसुधाला घेऊन बाईंच्या दवाखान्यांत गेलो. त्या दिवशीं त्यांनी इंजेक्शन दिलं व नंतरच्या प्रत्येक तिसऱ्या दिवशीं इंजेक्शन्स देत गेल्या. चार इंजेक्शन्स घेऊन झालीं तरी पाळी येईना, म्हणून मी बाईंना विचारलं,

'हिला दिवस गेलेले आहे असं दिसतं. अजून इंजेक्शन्स द्याय-चीत कां?'

'कांही उपयोग होईलसं वाटत नाही,' त्या म्हणाल्या, 'पंधरा दिवसांनंतर ह्यांना तपासायला आणा. त्याच्या आधीं नक्की मत देतां येणार नाही.'

पंधरा दिवसांनंतर वसुधाला शहाणेबाईंकडे पुनः घेऊन गेलो. त्यांनीं तिला तपासलं व दिवस गेले असल्याचा रिपोर्ट खरडला.

त्यानंतर साडेसहा महिने निघून गेले व चारपांच दिवसांपूर्वीं वसुधाच्या पोटांत कळा येऊं लागल्या. तिला ओकाऱ्या होऊं लागल्या.

**बाळकृष्ण मालू**







शहाणेबाईंना घरीं बोलावलं. तपासून झाल्यावर त्या म्हणाल्या, 'ह्यांना अपुऱ्या दिवसांचं मूल होत आहे. तें बहुधा वाचणार नाही.' मला मनांतून सूक्ष्म आनंदच झाला. कोणतेच प्रयास न करतां माझं काम होणार होतं. पण लगेच एक शंका मनांत आली. मी बाईंना विचारलं,

'बाई, हिच्या जिवाला तर धोका नाही ना?'

'नाहीं. त्यांची काळजी नका करूं. मूल वाचणं मात्र कठीण आहे.' मग त्यांच्याच सल्ल्यावरून वसुधाला त्यांच्याच प्रसुति-गृहांत भरती केलं.

आज दुपारी गोविंदा दवाखान्यांतून आला, तेव्हां आज संध्याकाळपर्यंत सगळं उरकून जाईल, असं बाईंनीं म्हटल्याचं तो म्हणाला. वसुधाच्या कळाहि वाढल्या असल्याचं त्यानें सांगितलं.

आतां इतक्यांत, किंवा थोड्यावेळांत तो निरोप घेऊन येईलच. कांहीहि होवो, वसुधा सुखरूप असली म्हणजे झालं. मुलाची पर्वा नाहीं. मेलेलंच निघालं तर बरं.

दारावर 'टकटक' होतं, तसा मनोहर भानावर आल्यासारखा उठतो व दाराकडे धावतो. त्या धांदलींत स्टुलावर ठेवलेल्या काचेच्या फुलपात्राला धक्का लागून तें खाली जमिनीवर पडतं. त्या लहानशा आवाजानें मनोहर केवढ्यानें तरी दचकतो. फुलपात्र फुटून कांचेचे तुकडे इतस्ततः विखुरलेले असतात. मनोहर भ्रमिष्टासारखा त्या तुटलेल्या फुलपात्राकडे बघत उभा रहातो.

दारावर पुनः 'टकटक' होतं तेव्हां तो विचारतो,

'कोण ?'



'मी गोविंदा, साहेब.'

तो धावून दार उघडतो.

'झालं साहेब," गोविन्दा उजळलेल्या चेहऱ्यानें म्हणतो, 'बाळबाळंतीण सुखरूप.'

'बाळ--'

'चांगलं गुटगुटीत आहे. साडेसहा महिन्यांचं असं कुणीं म्हणणार नाहीं. पुऱ्या दिवसांचं दिसतं.'

मनोहरला चक्कर आल्यासारखं वाटतं. तो तिथल्याच खुर्चीत बसतो. त्याचा भकास चेहरा बघून गोविन्दाला कांहींच अर्थबोध होत नाहीं. तो म्हणतो,

'साहेब, माझं बक्षीस !'

'हो मिळेल तुला.' मनोहर इतकं म्हणतो व आंत जाण्यासाठीं उठतो. पलंगाशीं येतांच फुटलेल्या फुलपात्राची कांच त्याच्या पायाला लागते. पायांतून भळभळ रक्त वाहूं लागतं. त्याची पर्वा न करतां तो तसाच पलंगावर अंग झोकून देतो.

थोड्यावेळानें तो उठतो. पायाला पट्टी बांधून व कपडे बदलून बाहेर पडतो. राजकमल चौकाच्या कोपऱ्यावरच्या पानपट्टीच्या दुकानां-तून एक कॅप्स्टनचं पाकीट विकत घेतो. कधींच रस्त्यानें सिगरेट ओढत नसून देखील ती तो तिथल्याच दिवालगिरीवर शिलगावतो.

'कॅफे फेमस' समोर थांबण्याची त्याची इच्छा नसते. मित्रांना भेटण्याची सुद्धां त्याला उगाचच लाज वाटते.–त्यांचं अजून लग्नं देखील झालेलं नाहीं व आपल्याला मुलगाहि झाला आहे–साठे नाहीं नाहीं तसा चिडवेल. लग्नाच्यावेळीं त्यानें थोडी थट्टा केली होती !—

विचारांच्या तंद्रींत तो 'प्रभात' पाशीं पोचलेला असतो. 'प्रभात' च्या व्हरांड्यांत लावलेल्या 'छाया' चित्रपटाच्या दृष्य-चित्रांकडे बघत उभा रहातो. त्यांतल्या एका चित्रांत निरूपा रॉय एका लहान मुलाला घेऊन धावत असते. त्या चित्राकडे तो कितीतरी वेळ पहात रहातो.

एकाएकी त्याच्या पाठीवर थाप पडते. तो दचकून मागें पहातो. 'काय मनोहरपंत ? एकटेच !' त्याचा मित्र–सबनीस–हंसत म्हणतो. आपलं त्या चित्राकडे एकटक पहाणं सबनीसच्या लक्षांत आलं आहे असं वाटून मनोहर अकारणच मनांत खजील होतो. उगाच सारवा-सारव करण्याच्या उद्देशानें म्हणतो,

'पिक्चर पहायला आलों आहे.'

'मग घेतलं नाहीं कां तिकीट ?'

'घेतो ना.' असं म्हणून तो तिथल्या बुकींग ऑफीसमधून एक बाल्कनीचं तिकीट विकत घेतो. न्यूजरील संपून मुख्य चित्रपटाला सुरवात होते. त्याचे सगळे विचार दवाखान्यांतल्या वसुधा व मुलांभोंवती घोटाळत असतात. तो नुसताच समोर बघत असतो. त्याचा अर्थबोध मात्र त्याला होत नाहीं. चित्रपटांत त्याला कांहींच 'चार्म' वाटत नाहीं. आपल्या जीवनांतहि आतां 'चार्म' रहाणार नाहीं असं त्याला प्रखरतेनें वाटून जातं. आपलं वय खूप झालं आहे, आपलं तरुणपण संपलं आहे, आतां आपण संसाराचा गाडा ओढणारे गृहस्थ झालों आहोंत...चित्रपटांतल्या एका दृष्यानें त्याच्या विचारांची साखळी तुटते. निरूपा रॉय आपलं मूल घेऊन धावत असते. त्याच दृष्याचं चित्र बघत असतांना सबनीसनें त्याच्या पाठीवर थाप मारलेली असते. आतांहि तो तिऱ्या







अनुक्रमणिका

दृष्टीनें सबनीसकडे बघतो. सबनीस मात्र चित्रपट बघण्यांत मश्गुल असतो. त्याचं लक्ष नसलेलं बघून मनोहरला हायसं वाटतं. आपलं त्या चित्राकडे पहाणं सबनीसच्या लक्षांत आलेलं नाहीं, त्याला कांहींच कळलं नाहीं, ह्या समाधानांत तो हंसतो. मग त्याला चित्रपट पहाण्याचंहि प्रयोजन वाटत नाहीं. सबनीसला तो म्हणतो,

'अच्छा सबनीस, मी चलतो.'

'कां रे?'

'माझी तब्येत बरी नाहीं आज.'

'काय होतंय्?'

'कपाळ दुखतंय. अच्छा.'

तो बाहेर पडतो व सिगरेट शिलगावतो. 'राजकमल'कडून न जातां तो 'चित्रा'कडून निघतो. इकडूनं जायला त्याला जवळजवळ अर्धा तास लागणार असतो. पण त्याची त्याला पर्वा नसते. आज आपल्याला कुणींच दिसूं नये, अशी त्याची इच्छा असते. इकडून ओळखीचं कुणीच भेटण्याची शक्यता नसते.

तो शहाणेबाईंच्या दवाखान्यापाशीं येतो. तिथें सगळीकडे शांतता पसरलेली असते. तो आपल्या मनगटाकडे पहातो. साडेआठ वाजलेले असतात. तोंडांतली सिगरेट बुटाखाली चिरडतो व फाटक उघडून आंत शिरतो. आठ नंबरच्या रूमपाशीं येऊन एक क्षण थांबतो. मग दारावरची कडी हळुंच वाजवतो.

लगेच दार उघडलं जातं. त्याची आई दारांत उभी असते. त्याला बघून ती बाजूला होते. तो आंत शिरतो व इकडेतिकडे पहात तिथल्या एका गोधडीवर बसतो. क्षण दोन क्षण इकडे तिकडे पाहिल्यावर तो वसुधाच्या खाटेकडे पहातो. ती निपचित पडून असते. आढ्याकडे पहात. मग तो हळुंच पाळण्याकडे पहातो. पाळणा रिकामा असतो. मूल नर्सनें नेलं असावं, असं त्याला वाटतं. तो तसाच बसून रहातो.

त्याची अस्वस्थता व चुळबूळ त्याच्या आईच्या लक्षांत आलेली असते. ती कोरड्या स्वरांत म्हणते,

'मुलाला नेलं.'

'कुणी?' मनोहर भाबड्यासारखा विचारतो.

एक क्षण थांबून ती म्हणते,

'तें मेलं.'

'केव्हां?' मनोहर आश्चर्यानें विचारतो.

'दीड तासानंतर.'

त्याच्या मनांत कुठेतरी आनंदाच्या सूक्ष्म उर्मी उठतात. आपल्याला हवं असलेलंच झालं, ह्या समाधानानें त्याचा चेहरा उजळून निघतो. त्या आवेशांत तो यांत्रिकपणें उठून उभा रहातो, पण लगेच त्याला हातपाय गळल्यासारखं वाटतं. डोकं बधीर झाल्यासारखं वाटतं व तो पुनः मटकन् खालीं बसतो. थोडावेळ थांबून तो आईला विचारतो,

'ते पोचले असतील कां?'

'हो.'

एकक्षण त्याला कांहींच सुचत नाहीं. जणु त्याचं मनहि बधीर झालेलं असतं. मग मात्र हळूंहळुं त्याला आपणच अपराधी आहोत, अशी जाणीव होत जाते. आपल्या वाईट इच्छा लागूनच तो मेला, असं त्याला प्रखरतेनें वाटून जातं. त्याच्या मनांत गलबलतं. पोटांतल्या आतड्या गोळा होत आहेतसं वाटतं व एक क्षणानंतरच त्याच्या डोळ्यांतून खळकन् आसवं बाहेर पडतात.

वसुधा निपचित पडलेली असते, त्याच्या भरलेल्या डोळ्यांकडे निर्जिवपणं पहात. ●●●



अनुक्रमणिका




*कृष्ण चालला. समेट करावयास चालला. इतक्या दिवसांचे कष्ट व्यर्थ जाणार? इतक्या दिवसांचा संताप वाया जाणार? इतक्या दिवसांची ईर्ष्या बुझणार? इतक्या दिवसांच्या आकांक्षांवर पाणी पडणार? का तीं सारीं स्वप्नें भंगणार?*

# या केशपाशाचें स्मरण ठेव



**द्रौपद्याः पदवीं चर : १६**

## द्रौपदीला अनुसरून वाग

महाभारतांत जागोजाग द्रौपदीला यशस्विनी असें म्हटलें आहे. युधिष्ठिराच्या कर्तृत्वामुळें तिला जन्मभर जे अतोनात हाल, अपेष्टा आणि अपमान भोगावे लागले त्यांचा विचार करतां तिला यशस्विनी असें म्हणतां येईल काय? याचें उत्तर 'होय अवश्य येईल' असेंच आहे. युधिष्ठिरानें द्रौपदीच्या जीवनाची कांहींही परवड केली असली तरी युधिष्ठिराशिवाय इतर जे जे द्रौपदीच्या कक्षेंत आले त्यांनीं या मानिनीचा परमादर करून तिच्या जीवनास यथार्थता आणि यशस्विता आणली. प्रत्यक्ष कृष्णानें तिच्या डोळ्यांच्या इशाऱ्याबरोबर पृथ्वीची उलटापालट करावयाची तयारी नेहमीं ठेवली. भीम आणि अर्जुन यांची हीच अवस्था. नकूळ आणि सहदेव यांनींही तिला सुखच दिलें.

पण मुख्य महत्वाची गोष्ट म्हणजे सासू कुंती आणि द्रौपदी यांचे संबंध अत्यंत जिव्हाळ्याचे होते. पांडव भिकारी असतां ते पहिल्यांदा द्रौपदीस घेऊन घरीं आले तेव्हां द्रौपदीला प्रेमानें जवळ घेऊन कुंतीनें तिला आपल्या घरचे रीतीरिवाज समजावून दिले. हे रीतीरिवाज अगदीं साधे होते. भिक्षेचे दोन भाग करून त्यांतली अर्धी भिक्षा भीमास खाऊं घालावयाची हा त्यांतला एक रिवाज. ही गोष्ट दिसावयास अत्यंत क्षुद्र आहे. पण ती तशी नाहीं. भिक्षेची वांटणी करण्याचा अधिकार हा त्या परिस्थितींत जामदारखान्याच्या किल्ल्या कडोसरीस लावण्याचा अधिकार होता. किंबहुना सत्ता अशी त्या परिस्थितीत तेवढीच असून ती कुंतीने सर्वस्वी आपल्या अधिकारांत ठेवली होती. पण द्रौपदी आली त्या पहिल्याच क्षणीं कुंतीने आनंदानें ही सत्ता सोडली, सारी व्यवस्था द्रौपदीला समजाऊन दिली, भीमास मोठा भाग कां हें नीट स्पष्ट केलें. आपणास आणि सुनेला सारखाच भाग ठेवला आणि सारा अधिकार सोडून दिला. ही भिक्षा वाटण्याची क्षुद्र गोष्टच त्यांच्या मनोमीलनास कारण झाली, यांत शंका नाहीं. कुंतीचा समंजसपणा आणि द्रौपदीचा समजुतदारपणा यांचा दुग्धशर्करा योग झाला.

त्यामुळें कुंती ही द्रौपदीच्या पदवीला आणि सुखाला नेहमीं ओळखून आणि तत्पर राहिली. द्रौपदीला द्यूतप्रसंगीं अन्याय झाला आहे, आणि युद्ध करून का असेना पण तो अन्याय धुवून काढलाच पाहिजे, द्रौपदीचा अपमान झाला, याचा बदला घेतलाच पाहिजे, त्यासाठीं





अनुक्रमणिका

प्राण पाखडावे लागले तरी फिकीर नाहीं, पण द्रौपदीच्या दुःखाश्रूंची किंमत वसूल झालीच पाहिजे; ज्यांनीं ज्यानीं तिचा अधिक्षेप केला त्यांना त्यांना दंड झालाच पाहिजे अशी खंबीर भूमिका खुद्द एक द्रौपदीच सोडल्यास कुंतीशिवाय कुणाचीच नव्हती. श्रीकृष्ण वरवर का असेना पण दौत्य करावयास गेलाच होता. कौरव सरळ वागते तर समेट होताही. भीम आणि अर्जुन हेही शांतिपाठाचे डोस पिवून पिवून समेटास अनुकूल झाले होते. युधिष्ठिर तर काय ? द्रौपदीला कांहीं अन्याय झाला याची त्याला जाणीवच नाहीं. जोपर्यंत त्याचें सारें नीट चालत आहे, तोपर्यंत त्याला काहीं विवंचना नाहीं. लढून वा भीक मागून भाऊ खावयास आणीत आहेत, हा बसून खात आहे, यापुढें त्याला जीवन नाहीं.

पण कुंती ही द्रौपदीवर झालेल्या अन्यायास सदैव जागरुक आहे. युद्धाआधीं दूत म्हणून आलेला कृष्ण परत जावयास निघाला तेव्हां, ज्याचा उपयोग होण्याची फारशी आशा नव्हती, असा उपदेश कुंतीनें धर्मासाठीं म्हणून सांगितला. पण शेवटीं जो खास निरोप तिनें अर्जुनाला दिला तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ती म्हणते,

--'तूं अर्जुनाला आणि भीमाला हा निरोप नीट सांग. क्षत्रिय स्त्री ज्यासाठीं पुत्राला जन्म देते त्या पराक्रमाचा अवसर आतां आला आहे. श्रेष्ठ पुरुष एकदां वैराला आरंभ केल्यावर विश्रांती घेत नाहींत. माझी कल्याणमयी सून यशस्विनी द्रौपदी, परमसौभाग्यशाली कुलामध्यें जन्माला आलेली आहे. तिनें या सर्वांशीं जी आदर्श वागणूक ठेवलेली आहे ती केवळ तिच्याच थोरवीला साजेशी आहे.

—प्राण पणाला लावून पराक्रम करावयाचा आतां समय आलेला आहे. क्षत्रियधर्मानें वागून वैभव जिंकण्याचा काल आतां पुढें ठेपला आहे. कारण तुमच्या सगळयांच्या डोळयादेखत तुमच्या गृहलक्ष्मी द्रौपदीला जे अपमानकारक शब्द बोलले गेले आहेत त्याचा बदला घेतला गेलाच पाहिजे. असा कोण पुरुष आहे कीं जो या उद्गारांना क्षमा करणें शक्य आहे असें मानू शकेल ?

--राज्य हरवलें गेलें; जाऊं द्या. त्याचें मला दुःख नाहीं. युधिष्ठिर जुगार हरला, हरूं द्या ! त्याचें मला दुःख नाहीं. माझ्या पोटच्या पोरांना वनवास घडला, घडूं द्या. त्याचीही मी काळजी करीत नाहीं. पण भर सभेमध्यें माझी तरुण आणि सुंदर अशी निष्पाप सून द्रौपदी ही रडत असतां तिला जीं कटुवचनें ऐकविलीं गेलीं आहेत त्याचें मला मरणाहून दुःख आहे. त्याची भरपाई झालीच पाहिजे.

—राणीच्या धर्मामध्यें सदा तत्पर रहाणारी ती माझी सर्वांगसुंदर, सती, पतिव्रता, पुण्यवती सून जेव्हां विटंबिली गेली तेव्हां, श्रीकृष्णा, ती विटाळशी होती. पाच नाथ असतांना ती तेव्हां अनाथ झाली होती. कृष्णा याचें स्मरण तूं अवश्य त्या दोघांना करून दे. भरल्या सभेमध्यें कौरव तिला जे अपशब्द बोलले ते भीमार्जून विसरले काय ? तसें असेल तर मी त्यांची पुन्हां आठवण करून देत आहे. कृष्णा तूं माझा भाचा आहेस. जा, तू माझ्या मुलांचें रक्षण कर. अर्जुनाला निक्षून माझें पुन्हा पुन्हां सांगणें सांग कीं ( द्रौपद्याः पदवीं चर । ) तू एक द्रौपदीचाच मार्ग अनुसर. एक ती सांगेल तसेंच वाग. तिची इच्छा असेल तेच पार पाड.

द्रौपदीच्या हितासाठीं, मानासाठीं कुंती किती जागरूक होती ! द्रौपदीची वेणी घालण्यासाठींच एवढें युद्ध करण्यांत आलें. या युद्धाच्या धुरंधर सेनापतींना 'द्रौपदीच्या आज्ञेंत वागा' असा आदेश कुंतीनें दिला आहे आणि तो आदेश पाळला गेला आहे. द्रौपदी ही अर्जुनासारख्या सेनापतीची सेनापती होती. कृष्णासारख्या नियंत्याची नियंती होती. दानास लालचावलेल्या लाचार भिक्षुकांनी भारतीय युद्ध हें युधिष्ठिरास दानसमर्थ राजा बनविण्यासाठीं लढलें गेलें असा रंग त्यांत भरला असला तरी हें युद्ध युधिष्ठिरास आयतें खावयास मिळावें म्हणून लढलें गेलेलें नाहीं. तें द्रौपदीच्या मानासाठीं तिच्या आज्ञेनें लढलें गेलें आहे.

### स्मर्तव्यो केशपक्षोऽयं १७:

## या केशपाशाचें स्मरण ठेव

भारतीय युद्ध हें द्रौपदीस जी मांडी उघडून दाखविली गेली तिचा चूर करण्यासाठीं लढलें गेलें याची अजिबात जाणीव नसलेला एकमेव महाभाग म्हणजे युधिष्ठिर होय. हें युद्ध आपलें पोट भरण्याची सोय व्हावी म्हणून होणार आहे अशी त्याची धारणा असते. त्यामुळें युद्ध टाळतां येऊन पोट भरलें तर तो संतुष्ट असतो आणि याचसाठीं त्यानें दुर्योधनाकडे पांच गांवांची भीक मागितलेली असते. लाचार भिकाऱ्यास कसें ठोकरून उडवावें हें दुर्योधनास पूर्ण माहीत असल्यानें त्यानें युधिष्ठिरास बरोबर ठोकरलेलें असतें. तरीही युधिष्ठिराचें पौरुष जागें न होतां तो जातिवंत भिकाऱ्याप्रमाणें भीक मागतच असतो. संधीचा आणखी एक प्रयत्न म्हणून तो कृष्णास म्हणतो, 'कृष्णा तू तरी जाऊन प्रयत्न कर कीं आमची कौरवांशीं रणांत गांठ पडणार नाहीं.'

त्यावर कृष्ण म्हणतो, 'प्रयत्न करावयाचा ठेवला असें लोकांनीं म्हणूं नये म्हणून मी जाऊन प्रयत्न करतों. तुमच्या पक्षास यत्किंचित उणेपणा न आणतां समेट झाला तरच मी तो करीन. कुणी सांगावें ? यश मिळण्याचा संभवही आहे. निदान लोकांना नावें तरी ठेवतां येणार नाहींत.'

ज्याचा निरपवाद आधार वाटत होता तो कृष्णही समेटास तयार झालेला दिसला तेव्हां द्रौपदीस फार दुःख झालें. तिला काय करावें हें कळेना. कृष्ण खरोखर काय करणार आहे तेंही कळेना. कृष्णानें आजवर जीं वचनें आणि धीर दिला त्याच्या विरुद्ध हें कृष्णाचें वर्तन होतें. तो समेट करवोच असें म्हणत नव्हता हें खरें. पण समेट होणारच नाहीं असेंही म्हणत नव्हता. मग आतां समेट झाला तर ?

तर काय ? जी मांडी आपणास निर्लज्जपणें उघडून दाखविण्यांत आली ती काय भंग होणारच नाहीं ? पांच बैलांकडून संभोग घेणारी गाय असें ज्या जिभा आपणास म्हणाल्या त्या का उखडल्या जाणारच नाहींत ? आपणांस रजस्वला अवस्थेमध्यें नग्न पहाण्याची इच्छा ज्या डोळयांना झाली त्यांच्या का खांचा होणारच नाहींत ? ज्या हातानें आपली निरी ओढली तो हात काय शाबूतच रहाणार ? जे आपणास बंधकी, दासी असें म्हणाले त्यांचा चेंदामेंदा होणारच नाहीं ? आपली वेणी बांधली जाणारच नाहीं ? दुःशासनाचें रक्त पिण्यासाठीं आसुसलेले हे केस का शेवटीं शुष्कच रहाणार ?

कृष्ण चालला. समेट करावयास चालला. आतां पुढें काय होणार ? इतक्या दिवसांचे कष्ट काय व्यर्थ जाणार ? इतक्या दिवसांचे शाप विफल होणार ? इतक्या दिवसांचा



अनुक्रमणिका















अनुक्रमणिका

संताप वाया जाणार ? इतक्या दिवसांची ईर्ष्या बुझणार ? इतक्या दिवसांच्या आकांक्षांवर पाणी पडणार ? का तीं सारीं स्वप्नें भंगणार ?

कृष्णावर विश्वास आहे खरा. पण त्याच्या मनांत काय आहे ? कौरव समेटास तयार झाले तर हा काय करील ? छेः यावेळीं नुसतें स्वस्थ बसून चालणार नाहीं. हा क्षण बहु-मोलाचा आहे. हा हातचा गेला म्हणजे गेला. हें द्रौपदीनें ओळखलें. आपला विपुल आणि मोकळा केशसंभार झपाट्यानें छातीवर ओढून ती तेजस्विनी भरल्या सभेंत उभी राहिली. आणि तिनें कृष्णाला अडविलें. शांतिपाठ गाणाऱ्या धर्मास काय वाटेल याची काडीमात्र पत्राज न बाळगतां आणि सभेच्या मताची तमा न धरतां ती कृष्णास म्हणाली,

—' कृष्णा, दुर्योधनानें कोणतें वर्तन करून आम्हांस सुखापासून वंचित केलें आहे हें तुला ठाऊक आहे. युद्धापासून खचून हा युधिष्ठिर पांचच गावांवर संतुष्ट व्हावयास तयार झाला आहे. पांच गांव देवूनही संधी करावयास जो तयार नाहीं त्याच्याशीं कसला संधी करावयास तू निघाला आहेस. कांहीही न घेतां शरण जाणें एवढाच मार्ग उरला आहे. तो पहावयास तू निघाला आहेस काय ? कृष्णा समेट आपणास नको आहे. समेट हीनबलांनीं करावा. ही संधीची धडपड कशासाठीं आहे ? क्रोधानें भरलेले हे पांडव काय दुर्योधनाशीं लढा देण्यास असमर्थ आहेत ? सामदामाचा प्रयोग कौरवांवर करण्याचा का हा समय आहे ? कीं हा क्षमा करण्याचा समय आहे ? हा समय केवळ दंड करावयाचा आहे. कौरवांना प्रखर शासन आतां अविलंबें झालेंच पाहिजे. हें पांडवांचें कर्तव्य आहे. तें केलें तरच यांच्या यशाचा विस्तार होणार आहे, आणि जो जो म्हणून क्षत्रिय असेल त्याला समाधानाचें सुख लाभणार आहे.

—कृष्णा अवध्याचा वध केल्यावर पातक लागतें हें मी तुला सांगावयास नकोच. पण वध्य माणसाला ठार मारलें नाहीं तरही पातक लागतें हें तूं नीट ध्यानांत ठेव. तू असाच प्रयत्न केला पाहिजेस कीं तुला हें पातक न लागावें. कौरव वध्य आहेत आणि त्यांचा वध झालाच पाहिजे हें तूं विसरूं नकोस.

—कृष्णा मी द्रुपदाची कन्या आहे. माझा जन्म पवित्र आहे. मी पराक्रमी धृष्टद्युम्नाची बहीण आहे. मी पवित्र कुलांतील पंडूची सून



# युद्धस्य कथा

## कधीं कधीं असेंहि होतं

*[पुराणेतिहासांतल्या काल्पनिक युद्ध-कथा वाचतांना क्षणभर आपण विस्मयानें थक्क होतो. मग विसाव्या शतकांतील आधुनिक शस्त्रास्त्रांनीं लढलेल्या युद्धांतील प्रत्यक्षानुभव जर आपणाला कुणी सांगितले तर आपल्या अंगावर रोमांच उभे राहिल्याशिवाय रहाणार नाहींत.*

*प्रस्तुत लहान लहान कथा भारतीय फौजेंतील एका जबाबदार सेवा-निवृत्त अधिकाऱ्यांनीं खास दीपावलीसाठीं लिहून पाठविल्या आहेत. लेखकानें त्या स्वतः अनुभवलेल्या आहेत. कांहीं घटनांत स्वतः लेखक असल्यामुळें त्या वाचतांना क्षणभर श्वासहि रोधावा यांत नवल नाहीं...]*

आतां ही गोष्ट ऐका. ही गोष्टसुद्धां दुसऱ्या महायुद्धांतील बर्माच्या आघाडीची आहे.

सन १९४२–४३ सालची गोष्ट. जपानी फौजा विजयोन्मादामध्यें सर्व आघाड्यांचेवर 'आगेकूच' करीत होत्या. जपानी लष्करी डावपेंच अजून इंग्रजी आणि हिंदी फौजांना आत्मसात झाले नव्हते. जपानी सेनांची तोंडओळखहि नुकतीच कोठें होत होती. तसेंच त्याचवेळेस बर्माच्या रणक्षेत्रांत जपानी तोंडावळ्याशी बरेचसें साम्य असणाऱ्या चिनी आणि बर्मी फौजाही दोस्त सैन्याचे बाजूनें लढत होत्या. भाषाही कोणचीच समजत नव्हती. त्यामुळें कधी कधी विलक्षण घोटाळा उडत होता. कांहीं अंतरावरून दोस्त समजून जवळ यावे तर निघायचे जपानी. त्याचे उलट जपानी समजून हल्ला करावा तर असावयाचे चिनी अथवा बर्मी. असा एकंदरींत ब्रह्मघोटाळाच होता. असो.

माझे एक हिंदी मित्र कॅप्टन असून त्यांचे पलटणीबरोबर बर्मा आघाडीवर होते. एकदां त्यांची कंपनी ( अंदाजे १२५ शिपाई ) व ते स्वतः त्यांचे डिव्हिजनचे जनरल यांचे खास संरक्षणाकरिता नियुक्त झाली होती. जपानी सैनिक रात्रीच्या अंधाराचा फायदा घेऊन व दोस्तांच्या आघाडीवर दोन दोन तीन तीन माणसांच्या गटानी घुसून, आघाडीपासून २–३ मैल मागे असलेल्या दोस्तांच्या महत्वाच्या ठिकाणावर छापा घालण्यांत तरबेज झाले होते. त्यामुळें जनरल साहेबांच्या संरक्षण करणाऱ्या कंपनीस डोळ्यांत तेल घालून व अतिशय






जागरूकपणें पहारा द्यावा लागत असे. कप्तान साहेबांवर सर्व जबाबदारी असल्यामुळें त्यांना रात्रभर जागून रहावें लागत असे.

अशाच एका रात्रीं तीन वाजण्याचे सुमारास कप्तान साहेब गस्त घालून परत येत होते. तेव्हां त्यांना चांदण्यांत कांहीं संशयास्पद हालचाल दिसून आली. म्हणून त्यांनीं आपल्या कंपनीस धोक्याचा इशारा दिला व ५–६ शिपाई त्या जागेवरती चौकशी करितां पाठविले.

पहाता पहाता जनरल साहेबांचे हेडक्वॉर्टरला जमान्यांनीं वेढा घातला. कॅप्टनसाहेब त्वरेने जनरलसाहेबांचे तंबूकडे गेले. आघाडीवर गेले. दोनतीन दिवस सामसूम राहिल्यामुळें जनरल साहेब व त्यांच्या हाताखालील अधिकारी शांत चित्ताने गाढ झोपी गेले होते. वरिष्ठ अधिकाऱ्यांना देण्याचा मान व दाक्षिण्य दाखविण्यास वेळच नव्हता.

कॅप्टनसाहेब सरळ जनरलसाहेबांच्या तंबूत गेले व त्यांना गदगदा हालवून ते जागे झाल्यावर त्यांना थोडक्यांत माहिती सांगितली. जनरलसाहेब 'स्लीपिंग सूट' मध्येंच होते. त्यांनी कॅप्टनसाहेबांचा हात धरला व त्यांना म्हणाले, 'माझ्यासारखा ब्रिटिश आर्मीचा एक जनरल जपान्यांच्या हातांत पडणें ह्यासारखी लांछनास्पद घटना कोणतीहि नाहीं. तेव्हां मित्रा, बाकी हेडक्वॉटरची मला पर्वा नाहीं. पण कमीत कमी मला तरी ह्या घेऱ्यांतून बाहेर काढ. मी तुझी आठवण विसरणार नाहीं.'

दोघांच्याहि सुदैवानें कॅप्टनसाहेबांनीं, आपल्या प्राथमिक परीक्षणांत, अडीअडचणीला उपयोगी पडणाऱ्या एका चोरवाटेची पाहणी करून ठेविली होती. त्यांनी लागलीच आपली अर्धी कंपनी जनरलसाहेबांच्या संरक्षणाकरितां देऊन 'स्लीपिंग सूट' घातलेल्या जनरल साहेबांना आणखी अर्धा मैल मागे सुरक्षित स्थानी पोहोंचवून ते स्वतः राहिलेल्या लोकांनिशी उजाडेपर्यंत शत्रूशीं सामना करीत राहिले.

जनरल साहेब सुद्धां आपला वायदा विसरले नाहींत. त्यांचे शिफारसीवर दोन महिन्यांचे आंतच कॅप्टनसाहेबांना "कॅप्टन क्रॉस" हे शौर्याचे निदर्शक असे पदक मिळाले.

---

[ या सर्व सत्यकथा असल्यानें अर्थातच मूळची नांवें बदलून काल्पनिक नांवें दिलेलीं आहेत. स्थळाचा निर्देश मात्र सत्य आहे. ]

---

आहे. मी या तेजस्वी पांडवांची बायको आहे. मी पांच महारथी पुत्रांची माता आहे आणि सर्वांहून खास म्हणजे मी तुझी मैत्रिण आहे. मी अशी सौभाग्यवती असतां या पांडवांच्या डोळ्यांदेखत आणि तू एवढा मोठा जिवंत असतां माझे हे केंस खेचले जाऊन माझा वारंवार अपमान केला गेला आहे. माझा छळ झाला आहे. तुम्ही सर्व जिवंत असतां मला दासी म्हणून सभेंत खेंचलें गेलें आहे. हे पांडव तेव्हां नादानाप्रमाणें स्वस्थ बसले होते. गैरहजर अशा तुझाच तेवढा मला आधार वाटला होता. आणि त्याच्याच जोरावर मी त्या प्रसंगांतून निभावलें. आतां यापुढें जर दुर्योधन एक क्षणभरही जिवंत रहावा असे तुमचे प्रयत्न असतील तर या अर्जुनाच्या गांडीव धनुष्याला आणि भीमाच्या पौरुषाला धिक्कार असो. तुला जर यापुढें माझ्या मैत्रीची किंमत वाटत असेल तर तू कौरवांवर फक्त कोपच करावयास हवा.

असें म्हणून, तिनें आपले सुंदर, गेंदेदार, काळेकुळकुळीत, कोमल, सुलक्षणी आणि सुगंधी असे केंस सळसळणाऱ्या नागिणीप्रमाणें डाव्या हातांत पकडले आणि ते कृष्णाच्या पुढें धरून ती पुढें म्हणाली, "कृष्णा यापुढें तू जें जें करणार आहेस त्यावेळीं या दुःशासनानें विटंबिलेल्या केशांचें स्मरण ठेव. तुमच्या हातून भेकडपणामुळें मला सुखी करण्याचें होणार नसेल तर माझा भाऊ आणि बाप हे कौरवांचा वध करतील. माझे पुत्र माझ्या आज्ञेत आहेत. ते अभिमन्यूस पुढारी करून कौरवांना दंडितील–तुमच्याशिवाय मी निराधार आहे असें समजूं नकोस. तुमच्या हातून माझी मनीषा पूर्ण होणार नसेल तर मी माझा मार्ग पाहीन. पण दुःशासनाचा हात तुटून चिखलांत लोळलेला पाहिल्याशिवाय मी शांत होणार नाही. प्रचंड अग्नीप्रमाणें धुमसणारा हा कोप मी तेरा वर्षे जोपासला आहे यांत कौरव जळतीलच जळतील."

असें म्हणून ती मुसमुसून रडूं लागली. जणूं तिचा क्रोध तापून पातळ झाल्यामुळें वर उसळत होता. कृष्ण हा वस्तुतः समेट करावयास जात नव्हता. युधिष्ठिराच्या शांतीनें नादानपणाची परिसीमा ओलांडली होती. त्या निर्णयशून्य पुरुषाच्या हातीं पुढारीपणा असेतों वाटाघाटींचा घोळ सडत रहाणार होता. ही कोंडी कोणींतरी फोडणें आवश्यक होतें. त्यामुळें तें दायित्व आपणावर घेऊन, शत्रूच्या गुहेंत घुसून त्यास लाथ मारावी आणि युद्धाचा दिवस नक्की ठरवावा असाच उद्देश मनांत धरून कृष्ण उठला होता. द्रौपदीचें वरील ज्वलंत भाषण ऐकून तो तिला म्हणाला,

—कृष्णे, तुझा ज्यांच्यावर कोप आहे त्यांच्या बायका अशाच रडतील यावर तू विश्वास ठेव. तुझ्या मनांत जें आहे तेंच मी करणार आहे. हिमालय पर्वत हटेल, पृथ्वीचे तुकडे होतील, नक्षत्रांसह आकाश कोसळेल, पण मी तुला दुःख होईल अशी गोष्ट करणार नाहीं. कृष्णे, तू अश्रू आवर. मी तुझ्यासमोर आणि मला समेटासाठीं पाठविणाऱ्या या पांडवांसमोर इथें प्रतिज्ञा करतो की मी तुझ्या सर्व शत्रूंचा विध्वंस केलेला तू डोळ्यानीं पहाशील.

——माझ्यावर विश्वास ठेवून तू निश्चिंत रहा. तुझे हे केस कधींही माझ्या नजरेआड झालेले नव्हते आणि होणार नाहींत. याचेंच नेहमी स्मरण करावयाचें हें मी विसरलेला नाहीं.

## एतादृशं कर्म न शुश्रुम ॥ १८

## हिच्यासारखी केवळ हीच

युधिष्ठिरानें जें घोर संकट द्यूतप्रसंगीं द्रौपदीवर आणलें त्यातून तिची सुटका कृष्णानें केली असा अविचारी समज आपण दृढमूल करून ठेवला आहे. मी त्या प्रसंगीं हजर नव्हतो या कृष्णाच्या उद्‌गारांकडे साफ दुर्लक्ष करून कृष्णाला देवावतार करावयाच्या मार्गें लागलेले पारलौकिक आपण कृष्णानें द्रौपदीस वस्त्रांचा पुरवठा केला इत्यादी काल्पनिक अद्‌भुत नाट्यांत एवढें मश्गूल होतों कीं त्या प्रसंगीं वास्तविक प्रकट झालेल्या द्रौपदीच्या श्रेष्ठ व्यक्तिमत्वाकडे आपलें लक्षही जात नाहीं.

वस्तुतः या संकटांतून द्रौपदीची सुटका कृष्णानें केलेली नाहीं. तो त्या प्रसंगी शाल्व राजाशीं लढाई करण्यांत गुंतला होता. द्रौपदीच्या सुटकेस कारण एक गाढव ( Ass )







अनुक्रमणिका

झालेला आहे. नुसतें वस्त्र हिसकून‌च द्रौपदीची विटंबना संपलेली नव्हती. त्यानंतर दुर्योधनाने अश्लीलपणें आपलें वस्त्र उचलून आपली पुष्ठ जांघ तिला उघडून दाखविली आणि तिला डोळा घातला. ही विटंबना आणखी कुठवर चालती नकळे. पण तेवढ्यांत एका गाढवानें अशुभसूचक अशा आवाजांत रेंकावयास सुरवात केली. पांडवांचें वैभव आपणास मिळत आहे याचा आनंद आणि भीमाच्या क्रोधापुढें दुर्योधनाचें काय होणार याची भीती यांच्या तुंबळ ओढाताणींत व्याकुळ झालेल्या धृतराष्ट्राचा धीर त्या अशुभ शकुनानें एकदां खचला आणि त्या अशुभाचें निराकरण करण्यासाठीं म्हणून धृतराष्ट्रानें द्रौपदीची आणि तिच्या हातीं पांडवांची मुक्तता केली. याचें श्रेय कृष्णास देणें अणि गाढवास नाकारणें हा वस्तुस्थितीचा आंधळा विपर्यास आणि कृतज्ञतेचा अक्षम्य अभाव होय.

आज आपणाला जी द्रौपदी ज्ञात आहे तिची घडण ही द्यूतांतून पांडवांवर जी संकटपरंपरा कोसळली तिच्यातून झालेली आहे. या घडणींतील द्रौपदीच्या तेजस्वी चारित्र्याचा पहिला पैलू या प्रसंगीं प्रकट होतो. भ्यालेला धृतराष्ट्र जेव्हां द्रौपदीस वर देऊं करतो तेव्हां ती युधिष्ठिर दास्यांतून मुक्त व्हावा असा वर मागते. वस्तुतः ती पांडवांच्या सर्व साम्राज्यापर्यंतचा कोणताहि वर मागूं शकती. पण तिनें फक्त युधिष्ठिराच्याच सुटकेचा वर मागितला.

याला कारण काय होतें बरें ? तिला झालेला ज्येष्ठ पुत्र हा युधिष्ठिराचा होता. भावी पिढीच्या या राजाला दासपुत्र हा कलंक लागूं नये यासाठीं त्याचा पिता दास्यमुक्त असणें जरूर होतें. यासाठीं तिनें युधिष्ठिराची–अनर्थाची मूर्त परंपरा अशा युधिष्ठिराची–मुक्तता करून मागितली.

कर्णाचें या गोष्टीकडे सूक्ष्म लक्ष होतें. स्वतःच्या स्वार्थासाठीं त्याच्या पदरीं दास्य बांधणारी त्याची बेजबाबदार माता आणि द्रौपदींत त्याला आतां दिसलेली माता यांतील ज्वलंत स्वतःचाच पुत्र दासपुत्र बनण्याचा प्रसंग आल्याने, ज्या क्षणीं द्रौपदीस पटत होती, त्याच क्षणीं, जिला आपण अपमानाचा बदला म्हणून पार मातीमोल करण्याचा भीषण सूड उगविला त्या जगन्माउलीची महत्ता कर्णाला पटत होती. या जिवंत मातृत्वाच्या दर्शनानें त्याच्या मनांत जी भावना स्फुरली ती कल्याणच्या सुभेदाराची सून पाहून शिवाजीच्या मनांत स्फुरलेल्या पवित्र भावनेच्या तोलाचीच नसेल काय ? आपली माता द्रौपदीसारखी पुत्रकल्याणनिरत असती तर ! असें त्यास वाटल्यास नवल नाहीं.

द्रौपदी आणि धृतराष्ट्र यांचा संवाद पुढें चालूच होता. तिनें सर्वस्व मागावें आणि त्या योगें भीमाचा क्रोध शांत व्हावा अशी सुप्त इच्छा धरणारा धृतराष्ट्र द्रौपदीच्या या मागणीनें निर्घोर झाला नव्हता. त्यामुळें त्यानें दुसरा वर द्रौपदीस दिला आणि त्या वराप्रमाणें तिनें आपल्या इतर पतींस दास्यमुक्त करून आपल्या पांचही पुत्रांची दासपुत्रता टाळली.

भीमाचा क्रोध टाळणें हा धृतराष्ट्राचा धूर्त उद्देश द्रौपदीच्या निःस्वार्थीपणानें अशा प्रकारें विफल झाला. उलट भीम दास्यमुक्त होऊन आपल्या कोपास स्वैर वाट द्यावयास मोकळा झाला. तेव्हां घाबरून धृतराष्ट्र द्रौपदीस म्हणाला 'आणखीं वर माग–आणखी वर माग', त्यावर द्रौपदी धृतराष्ट्रास म्हणाली,

'लोभ हा सर्वनाशाचें मूळ असल्यानें मी आपणाकडून आणखी वर मागून घेऊं इच्छित नाहीं. पती मुक्त झाले यांत सर्व काहीं आलें. यापुढें मला जें हवें असेल तें संपादण्यास हे पती समर्थ आहेत.'

द्रौपदीच्या या तेजस्वी उत्तरानें धृतराष्ट्र पार नामोहरम झाला. त्याचें राजकारण धुळीस मिळालें. यापुढें तुझा निःपात करून मला वैभव देण्यास माझे पती समर्थ आहेत ही गर्भित सूचना त्याच्या जिव्हारीं लागली आणि हात जोडून पुढें उभ्या असलेल्या युधिष्ठिरास सारें वैभव बहाल करून त्यानें भीमास आवरावें अशा सूचना करण्याच्या मार्गास तो लागला.

स्वार्थांत बुरसलेल्या क्षुद्र कीटकांवर द्रौपदीच्या तेजाचा कसाही परिणाम झाला असला तरी त्या क्षुद्रांच्या मेळाव्यांत जो एक हाडाचा धीरोदात्त पुरुष होता त्याच्यावर याचा परिणाम काय झाला बरें ? हा महापुरुष अर्थातच कर्ण होय. कर्णानें द्रौपदीस विटंबिली ही गोष्ट धिक्कारणीयच होय. पण या विटंबनेची प्रेरणा द्रौपदीनें कर्णाच्या केलेल्या विटंबनेंत होती हें विसरतां येणार नाहीं. द्रौपदी ही स्त्री असल्यानें तिनें केलेल्या विटंबनेची परतफेड शस्त्रानें होऊं शकत नव्हती. ती केवळ द्रौपदीस दासी म्हणून विटंबूनच होणार होती. अपमानाचा बदला घेणें हें ईर्षावान कर्णास केवळ अपरिहार्य होतें. युधिष्ठिराचा नादान जुगार, एकलव्याविषयीं अर्जुनास वाटलेला क्षुद्र मत्सर या गोष्टी आपण मनुष्यसुलभ मानतों. पण अपमानाच्या इंगळ्या टोंचल्यावर त्याचा सूड घेण्याची दलितांची इच्छा आणि ईर्षा आपण मनुष्यसुलभ मानत नाहीं, याचें कारण आपली पांढरपेशी दृष्टी ही पळपाती आहे. आपण निःपक्षपातीपणानें दासपुत्र सूतपुत्र, यांच्या मनोरचनेशीं समरस होऊं शकलों, तरच कर्णानें द्रौपदीची विटंबना केली त्याचा न्याय करूं शकूं. न्यायासनावरील आपली नालायकी इथेंच संपत नाहीं. आपली तक्रार ही द्रौपदीची अब्रू विटंबिली अशा पांढरपेशा स्वरूपाची असते. स्त्रीची अब्रू विटंबिली अशी मानवतास्वरूप नसते. द्रौपदी काय आणि दासी काय दोघांच्या स्त्री म्हणून शीलाचें आणि अब्रूचें मोल एकच असतें. कुलीनतेच्या तोऱ्यांत आपला अपमान करणारी राज्ञी अशी दृष्टी कर्णाची असणें वेगळें. आपण न्याय करावयास हवा तो स्त्रीची अब्रू लुटणें हें धिक्कारणीय या

( पान ५२ वर )

विरोध त्याच्या ध्यानांत आला. नाट्यमय योगायोग असा कीं, कर्णाला दासपुत्र म्हणून आपण केलेल्या त्याच्या अपमानाची दारुण भीषणता,



# खुनी मोकाट सुटला आहे !



*पामर हा दिसायला देखणा, मिठ्ठास वाणीचा व नाकेला छोकरा—*
*खून करणं हा त्याच्या हातचा मळ. कितीं शांतपणें तो हें सारं करत होता.*
**कात्पनिक** *कथेपेक्षांहि भयंकर अशीं हीं सत्यकथा—*

ती बातमी मोठी विलक्षण होती! ती ऐकून जर्सीव्हाईलचे लोक भयचकित झाले. १९५९च्या ऑक्टोबर महिन्याची नऊ तारीख, शुक्रवारचा दिवस आणि त्या दिवशीं सकाळीं बातमी आली—एक खुनी माणूस जर्सीव्हाईलमध्यें छपून बसला आहे. सावधान !!

खुनी माणूस त्या गांवचाच होता. अवघ्या २१ वर्षांच्या ह्या बहाद्दराचं नांव होतं—जेम्स गॉर्डन पामर. पोलिस खात्यानें त्याचं हुबेहुब वर्णन दिलं होतं. 'देखणा, मिठ्ठास वाणीचा व नाकेला छोकरा कोणाचाही खून तो लीलया करूं शकतो व त्याबद्दल त्याला मुळींच वाईट वाटत नाहीं.' कांहीं दिवसांपूर्वींच त्यानें एका हॉटेल मालकाला लुटलें होते व वर त्याचा खून केला. इतकंच नाहींतर मालकाला वाचवायला निघालेल्या त्या हॉटेलची तरुण परिचारिका व वेटर ह्या दोघांनाही त्यानें मालकामागोमाग पाठविलें. अगदीं सफाईदारपणें! सहज !! ती परिचारिका व वेटर ह्यांनां त्यानें पिस्तुलाची जरब दाखवून जमिनीवर पालथं पडायला सांगितलं. आणि मग त्यानें त्यांच्या डोक्याच्या मागील भागावर गोळ्यांचा वर्षाव सुरूं केला. त्यांची हालचाल जेव्हां थांबली तेव्हां तो वर्षाव थांबला!

आठ ऑक्टोबरच्या रात्रीं एका पोलिसानें पामरला ओळखले पाहिलें. त्याबरोबर मदत घेऊन त्या पोलिसानें त्याचा पाठलाग करण्यास सुरुवात केली. शहराबाहेर आल्याबरोबर पामरनें आपल्या मोटारीतून बाहेर उडी टाकली व समोरील शेताच्या रोखानें त्यानें पलायन केलें. पाठलाग अर्धवटपणें सोडून देण्यांत आला. एका तासानंतर बातमी आली कीं त्यानें एका रेल्वे-कामगाराला ठार मारलें म्हणून. कारण काय? तर ज्या खंदकामागें तो लपला होता, त्या खंदकावर बसून










अनुक्रमणिका

हा 'इमानी' सेवक कंदील साफ करीत बसला होता ! आपण त्याच्या दृष्टीस पडूं नये म्हणून पामरने त्याच्यावर सरळ गोळी चालविली !!

ही बातमी आल्याबरोबर शंभर पोलिसांच्या एका तुकडीनें जर्सी-व्हांईल शहराला वेढा घातला. कांहींही झालं तरी तो मिळालाच पाहिजे ह्या ईर्षेनें ! ज्या दिशेनें पामर पळाला होता त्या दिशेकडे त्यांनीं 'ब्लडहाऊंड्स्' पिटाळलें पण ते श्वान जीभ बाहेर काढीत, दमून-भागून परत आलें ! पोलिसांनीं रस्ते न् रस्ते, गल्ल्या न् गल्ल्या तपासल्या. अनेक इमारतींतून कानोसा घेतला. प्रत्येक शाळेच्या बस-मधून एक शस्त्रधारी शिपाई ठेवण्यांत आला. शहराभोंवतीं असलेल्या शेताड्यांची हेलिकॉप्टरनें पाहणी सुरू झाली. जरा कुठें सळसळ दिसली कीं तीं विमानें कमालीच्या वेगानें खालीं येत, खात्री पटल्यावर मग पटकन् वर जात ! रेडिओवरून लोकांना इषारा देण्यांत आला कीं स्वतःच्या घराचें दरवाजे बंद करून घ्या !

झपाट्यानें वेळ निघून जात होती. जर्सीव्हाईलचे नागरिक आतां कमालीचे अस्वस्थ झाले होते. मात्र प्रत्येकजण बंदुकीनिशी तयार होता. —'येऊं दे, मारतोंच !' ही ईर्षा प्रत्येकजण बाळगून होता. पण मनांतून प्रत्येकजण घाबरत होता. कितीतरी लोक हॉटेलांत जाऊन राहिले.

त्या समोरच्या फ्रँकलीन स्ट्रीटवरील टुमदार घरांतल्या दोन खोल्यांत 'जॉर्मन ब्रदर्स' चं ऑफिस होतं. जेव्हां लुईस जॉर्मन संध्या-काळीं घरीं गेला तेव्हां आपली पत्नी व दोन मुलें भयभीत झाल्याचें त्याला दिसून आलें. बावन्न वर्षांच्या वृद्ध जॉर्मननें त्यांना खूप समजा-वलें. 'तुम्हीं पामरला घाबरता काय ? वेडे कुठले ! पामर आतां मेक्सिकोच्या वाटेवर असेल. इथें नसणारच तो !' पण पामर तिथेंच होता !!

लुईस जॉर्मन मात्र त्या रात्रीं अस्वस्थपणें झोपला. पहाटे पांच-पूर्वींच तो उठला व कपडे करून सरळ बाहेर पडला. एका 'कॅफे' मध्यें शिरून त्यानें कॉफी घेतली. हॉटेलमध्यें त्याला दोन गुप्त पोलिस भेटले. त्यांच्याबरोबर त्यानें गप्पा मारल्या. सात वाजल्यानंतर जॉर्मन तडक ऑफिसांत गेला. त्याच वेळी चार्लस व हे दोन ऑफिस-ड्रायव्हर्सही ऑफिसमध्यें येऊन ठेपले !

जॉर्मन जेव्हां कुलुप उघडूं लागला तेव्हां त्याला असं आढळून आलं कीं कुलुप आधींच कोणीतरी उघडलेलं आहे. कोणी उघडलं? आदल्या दिवशीं रात्री नीट बंदोबस्त आहे कीं नाहीं हें नोकराला त्यानें बघायला सांगितलं होतं. मग हें असं कसं घडलं? सरळ दार उघडून जॉर्मन आंत सामान ठेवण्याच्या खोलींत गेला. पाहातो तो तेथील खिडकीचं कांचेचं तावदान फुटलेलं ! पण त्या जागीं पुठ्ठ्याचं व्यव-स्थित आवरण घातलं होतं त्यामुळें हा आपल्या नोकराचा उपद्व्याप असावा असं जॉर्मनला वाटलं.

दरम्यान चार्लस् ड्रायव्हर ऑफिसच्या आंतील भागांत गेला आणि त्यानें काय पाहिलं? तो कमालीचा भयभीत झाला. त्या दृश्याकडे तो पुनः पुन्हां पाहत होता—एक माणूस '२२ चे पिस्तुल रोखून उभा होता ! चार्लस् कसातरी ओरडला, 'लुई, इथें आहे हा !'

तो पामर होता !!

उंच, सडपातळ, सुरेख डोळ्यांचा व टवटवीत चेहऱ्याचा पामर शांतपणें चार्लसला म्हणाला, 'मी सांगतो तसं कर म्हणजे तुझे प्राण सुरक्षित राहतील. जमिनीवर मुकाट्यानें बसून रहा व जराही हालचाल करूं नकोस !!' घाबरलेल्या चार्लस्नें मुकाट्यानें आज्ञापालन केलें. 'लुई, इथे आहे हा !' ही चार्लस्ची आरोळी ऐकून लगबगीनें आंत आलेल्या रॉबर्टस्—ही पामरची आज्ञा पाळावी लागली !!

[illegible]कडे जॉर्मननेंही चार्लस्ची आरोळी ऐकली. त्यानें लगबगीनें दरवाजा बंद केला. पामर आपल्या कंपनींत शिरलाय हें त्याला कळून चुकलं. तो खिडकी उघडूं लागला पण घट्ट बसल्यामुळें ती उघडूं शकली नाहीं. पामर जॉर्मनची प्रत्येक हालचाल न्याहाळीत होता. तो पळून जाण्याचा प्रयत्न करतो आहे हें पाहून पामर त्वेषानें ओरडला, "मुकाट्यानें खोलीबाहेर ये, नाहींतर मी गोळीबार करीन !' पामरचा माथेफिरूपणा माहिती असलेला जॉर्मन मुकाट्यानें दरवाजा उघडून बाहेर आला.

त्या दोघांच्या शेजारी ह्या तिसऱ्याला त्यानें बसविलें. नंतर पामरनें विचारलें, 'ह्या कंपनीचा मालक कोण आहे ?' त्याबरोबर जॉर्मननें मान हलविली. जॉर्मनला तो निगरगट्ट माणूस मग म्हणाला, 'मित्रा, तेवढी ती तिजोरी उघडून दे पाहूं !'

हें ऐकून जॉर्मन ताडकन् उत्तरला, 'मला ती उघडतां येत नाहीं. ती उघडतांना एक गुप्त कळ दाबावी लागते आणि आमचा ऑफिस मॅनेजर अर्नी पोहलमन ह्यालाच ती कळ ठाऊक आहे.'

यावर पामर शांतपणें म्हणाला, 'मित्रा, तूं खोटं बोलत आहेस. तुला आतांच्या आतां मारून टाकावा असं मला वाटतंय्. आणि तो पिस्तुल चालवूं लागला.

हें पाहून जॉर्मन कळवळून म्हणाला, 'मी बिलकुल खोटं बोलत नाहीं.' अर्नी आला कीं ती सेफ तो तुला उघडून देईल.

इतक्यांत एडवर्ड नांवाचा तिसरा ड्रायव्हर आंत आला. प्रकार काय आहे ? हें समजण्याच्या आंतच त्याच्या कानावर पामरचे शब्द आले—'मुकाट्यानें त्या तिघांच्या शेजारी बैस !' सर्कशींतलें श्वापद ज्या अदबीनें रिंग-मास्तरची आज्ञा पाळतं, त्या अदबीनें एडवर्डनें पामरची आज्ञा पाळली.

पुढचा 'कैदी' ठरला विल्यम् कुहेनल हा रेल्वे इंजिनियर. तो जॉर्मनसाठीं निरोप घेऊन आला होता कीं त्यानें मागविलेलं सिमेंट आलेलं आहे ! इंजिनियर नंतर आंत आलेला हर्शेल अॅन्ड्रयूज ह्या ऑपरेटरची तीच अवस्था झाली. डॅरेल स्मिथ हा मागाहून आलेला लॉरी ड्रायव्हरही ह्या 'मालिकेंत' गोवला गेला !!

सगळ्यांवर पामर एक विलक्षण जरब ठेवून होता. कोणीही हालचाल करीत नव्हता.

अर्नी पोहलमनला यायला आज उशीर झाला होता. तो आल्या-वर पामरनें त्याला नांव विचारलं. 'मी पोहलमन' असं तो म्हणाल्या-वर पामर उत्तरला, 'फार छान. तूंच मला हवा आहेस. अर्नी, ती तेवढी तिजोरी उघड पाहूं.'

पोहलमनही पामरला पुरा ओळखून होता. त्यामुळें कांही एक गडबड न करतां तो तिजोरीसमोर गुडघे टेकून बसला व तो तिजोरी उघडूं लागला. बराच वेळ ती उघडली गेली नाहीं. अर्नी तिजोरीच्या मुठीशी कांहीतरी [illegible] त्याचा प्रयत्न






अयशस्वी होत होता. वेळ जातो आहे हें पाहून पामर त्याच्यावर खेकसला, ' अर्नी, आतां फक्त एक मिनिटाचा तुला अवधी देतो. तूं जर ह्या अवधींत तिजोरी उघडली नाहीं तर तुझा मुडदा पाडीन मी. '

हें ऐकून जॉर्मन मध्येंच गुरगुरला, ' अर्नी, बिलकूल घाई करूं नकोस. एक मिनिट म्हणजे खूप वेळ आहे. '

पोहलमन आज दुर्दैवी ठरणार होता कां ? तिजोरी त्याच्याकडून खरोखरच उघडली जात नव्हती. म्हणून पामरचा निर्वाणीचा आदेश ऐकून त्याचा चेहरा पांढरा फटफटीत पडला. घामाच्या जलधारा त्याच्या चेहेऱ्यावरून निथळूं लागल्या. त्यानें शेवटचा प्रयत्न म्हणून पुन्हां विशिष्ट तऱ्हेनें तिजोरी हलविली आणि काय आश्चर्य ?

खुल जा समसम ! तिजोरी उघडली गेली ! !

मग पैशाची पेटी काढून त्यानें ती जमिनीवर ठेवली.

नंतर पामर कुहेनलला म्हणाला, ' आपण हे सर्व पैसे एका कागदाच्या पिशवींत भरा. ' कुहेनलनें आज्ञा पालन केल्यावर जॉर्मन पामरला म्हणाला, ' तुला जे हवं होतं तें मिळालं, आतां तू इथून जात कां नाहींस ?'

पण जॉर्मनच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत पामर त्या सगळ्यावर खेसकला व जॉर्मनला म्हणाला, " मित्रा, मी सांगतो तसा एक फलक लिही आतां—' ऑफिस दुपारी एकपर्यंत बंद राहील ' आणि हा फलक ह्या दरवाज्या बाहेर लटकाव " पामरच्या डोक्यांत कांहींतरी 'प्लॅन' होता ! !

एक कार्डबोर्ड घेऊन जॉर्मननें हवा तो मजकूर गिरविला. ती पाटी तो दरवाजावर लटकावित असतांना समोरच्या फुटपाथवर एक माणूस त्याला उभा असल्याचें दिसून आलें. त्याचं आपल्याकडे लक्ष केंद्रित करून घेण्यासाठीं तो बराच वेळ ती पाटी लावण्याचं सोंग करूं लागला. पण पामरचं त्याच्या हालचालींकडे बारकाईनं लक्ष होतं.

साध्या कामाला तो विलंब लावतो आहे हें पाहून तो ओरडला, ' मित्रा बाजूला हो, आणि जागेवर बैस. ' जॉर्मनचा नाइलाज झाला !

मग त्या ' टोळी ' ला उद्देशून तो म्हणाला, " तुमच्यापैकीं कोणाकडे चाकू आहे कां ? ' कोणीच उत्तर दिलं नाहीं हें पाहून कुहेनलला तो म्हणाला, ' मित्रा, तो कांचेचा तुकडा घे व टेलिफोनची वायर तोडून टाक पाहूं ' प्रत्येक वेळी ' मित्रा ' हा शब्द वापरून तो त्यांच्याशीं सलगी दर्शवित होता.

कुहेनलनें सांगितलेलं काम केल्यावर पामर म्हणाला, ' इथें कुठें दोरखंड आहे का ?'

पुनः कोणीहि उत्तर दिलं नाहीं. मंग पामरनें जॉर्मनला दरडावून विचारलें, ' मी विचारतोय, इथें दोरखंड आहे कां ? ' जॉर्मन उत्तरला, ' त्या समोरच्या माळ्यावर आहे. ती तिथें शिडी आहे. ' नंतर कुहेनलला त्यानें शिडी माळ्याला टेकवून, माळ्यावर जाऊन दोरखड आणायला सांगितला पण क्षणांत पामरनें हा विचार बदलला व ही कामगिरी जॉर्मनला सांगितली. उरलेल्या सात जणांना त्यानें पालथं झोपायला सांगितलं व हात मागें ठेवायला सांगितले. ' जर गडबड कराल तर जॉर्मन प्राणास मुकेल ! ' व जॉर्मनला बजावलं, ' आणि तू जर वर गडबड केलीस तर इथें मुडद्यांच्या राशी पडतील ! '

तो वर गेल्यावर एक 'धाडसी' विचार त्याच्या मनांत आला. तिथें असलेल्या वाळूच्या गोणींमागें तो लपला व तेथून मदतीसाठीं ओरडला तर पामर आपल्यावर गोळीबार करूं शकणार नाहीं व अनायासे ता पकडला जाईल. पण पामरचा माथेफिरूपणा ? —तो खुशाल ह्या सात जणांचा खून करील !! जॉर्मननें आपला बेत रहीत केला व तो दोरखंड घेऊन मुकाट्यानें खालीं आला.

नंतर जमिनीकडे तोंड करून झोपलेल्या त्या सातही जणांना ह्या दोरखंडानें बांधून टाकण्यास पामरनें जॉर्मनला सांगितले. पहिला कुहेनल झोपला होता. त्याच्या छातीभोंवती दोरखंड आवळण्यांत आल्यावर तो अर्धमेला झाला. पामरनें कुहेनल भोंवतीचं हें दोरखंडाचं आवरण बघितल्यावर तो जॉर्मनला म्हणाला, 'आवरण थोडं सैल बांध, दोस्ता, अगदीं फार घट्ट बांधूं नकोस नाहींतर मी ह्या माणसाच्या डोक्यांत गोळी घालीन !' एका विशिष्ट तऱ्हेचं आवरण पामरला अपेक्षीत होतं. जॉर्मननें तसं तें बांधल्यावर, तो कुहेनलच्या पुढे झोपलेल्या एडवर्डला दोरखंड बांधूं लागला. मागाहून एडवर्ड सांगत होता, 'भीतीनें माझं हृदय इतक्या जोरानें हालत होतं कीं मला वाटलं धरणी पण कंपायमान होते आहे !' जॉर्मनला कल्पना होती कीं पुढें ह्या सर्वांचं

( पान ५८ वर चालू )

( पान ४९ वरून )

भूमिकेवरून करावयास हवा. मग ती राज्ञी असो वा दासी असो. शीलावर राज्ञीचा जेवढा हक्क आहे तेवढाच दासीचा आहे याचा आपणास विसर पडतो. आपण द्रौपदी या शब्दावर भर देऊन तिची अब्रू विटंबिली म्हणून न्यायदानास बसतो. आपण न्यायासन न विटळावें हेंच बरें. आपणास स्त्रीचीच किंमत कळलेली नसते तर द्रौपदीची कुठून कळणार ?

पण आपणास द्रौपदीची किंमत कळलेली नसली तरी ती कर्णास पूर्णपणें कळलेली आहे. द्रौपदीचें सारें चरित्र तटस्थपणें पाहून आज तिची जी किंमत आपणास पटते तीच तिची किंमत वस्त्रहरण प्रसंगीं आपण कल्पितो आणि अशी द्रौपदी असें आपण म्हणतो. वस्तुतः अशी द्रौपदी पुढें घडावयाची आहे आणि ती अशी घडणार हें आपल्या आधीं कर्णानें ओळखलें आहे. त्यामुळें राज्ञी म्हणून तिच्या वैयक्तिक अपमानास पुढें सरलेला कर्ण, जेव्हां तिचें स्त्री म्हणून आणि माता म्हणून उदात्त असें स्वरूप या धृतराष्ट्राशीं झालेल्या संवादांत त्याला दिसून येतें, तेव्हां तिच्यापुढें मनोमन लोटांगण घालतो आणि म्हणतो, 'पृथ्वीवर ज्या ज्या म्हणून श्रेष्ठ स्त्रिया होऊन गेल्याचें आपण ऐकलें आहे त्या सर्वांत द्रौपदीची श्रेष्ठता अद्भुत आहे.'

द्रौपदीची खरी विटंबना केली ती आम्ही. आस्तिक परंपरेंत महाभारतावर भारुडें उभारणाऱ्या आम्ही हीन लोकांनीं. द्रौपदीची कर्णावर वासना गेली म्हणून ती झाडावरून पडलेलें जांभूळ पुनः वर चढवूं शकली नाहीं, कृष्णानें कर्णास पांडव पक्षास वळविण्यासाठीं द्रौपदीचा सहावा हिस्सा मिळेल अशी लालूच दाखविली इत्यादी भारतांत आधार नसलेल्या भुक्कड भाकडकथांचा रस जे आम्ही घेतों तेच आम्ही द्रौपदीचें वस्त्रहरण करणारे खरे पापी. कर्ण नव्हे. कर्णानें द्रौपदीची किंमत पटली तेव्हां पुरपूर मानली आहे आणि सादरपणें जाहीर बोलून दाखविली आहे. ( क्रमशः )

• • •









* काकासाहेब गाडगीळ
* 'नाइन् अवर्स टु राम'
* श्री. दादासाहेब रेगे
* आशियाई क्रीडा-महोत्सव

## साहित्य

### श्री. काकासाहेब गाडगीळ

पुढील महिन्यांत सातारा येथें भरणाऱ्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून सुप्रसिद्ध साहित्यिक व राजकारण विशारद श्री. न. वि. उर्फ काकासाहेब गाडगीळ ह्यांची निवड झाल्याचें जाहीर झालें आहे. प्रस्तुत गौरव-स्थानासाठीं श्री. गाडगीळांव्यतिरिक्त श्री. वि. वा. शिरवाडकर, श्री. बनहट्टी, चिंतामणराव जोशी व प्रा. कोलते ह्यांच्या सूचना आलेल्या होत्या. श्री. कोलते यांनीं आपलें नांव मागें घेतल्यामुळें उमेद्वारांत चौरंगी सामना होऊन श्री. काकासाहेब गाडगीळ मताधिक्यानें निवडून आलें. महाराष्ट्रीय राजकारणांतलें काकांचें स्थान अलिकडे विवाद्य गणलें गेलें तरी त्यांच्या साहित्यिक कार्यकर्तृत्वाबद्दल कोणाही रसिकाला संदेह असणें संभवनीय नव्हतें. काकासाहेबांची नर्मविनोदी शैली त्यांच्या नियतकालिकांतल्या प्रासंगिक लेखनामुळें सामान्य वाचकालाहि परिचित आहे. ह्या ललित विषयावरच्या त्यांच्या लेखाचे चार संग्रह लोकप्रिय ठरले आहेत. पण याशिवाय भारदस्त व अभ्यास परिपूर्ण लेखन काकांनीं केलेलें आहे. राजकारण व राज्यशास्त्रावरचे त्यांचें आठ ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत तसेंच अर्थशास्त्र व सामाजिक प्रश्नांवरही त्यांनीं विद्वत्तापूर्ण असे सहा ग्रंथ लिहिले आहेत. राजकारणाच्या आखाड्यांत पट्टीचे वक्ते म्हणून त्यांची ख्याती आहे पण दिल्लीच्या आणि औरंगाबादच्या साहित्य सम्मेलनांतली त्यांची उत्स्फूर्त वक्तव्येंही परिणामकारक ठरली होतीं. पंजाबचे राज्यपाल म्हणून चंदिगड येथें रहात असताना त्यांचे निवासस्थान हें आमंत्रित अथवा अनाहूत महाराष्ट्रियांना सदैव मुक्तद्वार असे. एवढेंच नव्हे तर आपला उच्चाधिकार विसरून मायदेशीच्या माणसांशीं मिसळण्याची त्यांची वृत्ति पाहून काकांच्या हाडीमाशीं खिळलेल्या महाराष्ट्रीय दिलदारपणाचा प्रत्यय अभ्यागतास येऊन त्याला पुष्कळदां काकांची ही थट्टा तर नव्हे असें वाटून तो बावरून जात असे. श्री. काकासाहेबांनीं एकाच राजकीय पक्षाशीं एकनिष्ठ राहून जरी राजकारण केलें तरी स्वाभाविक खिलाडूपणामुळें शत्रूपक्षांतही ते तितकेच लोकप्रिय ठरले. गप्पा मारणें हा काकांचा छंद प्रामुख्यानें मानला तरी साहित्याचें खाद्य व खाद्याचें साहित्य हे त्यांचे गुणप्रकर्ष ठरावेत. चंदिगडसारख्या भिन्नभाषीय प्रांतांत एकजीव होण्याचे त्यांचे उपक्रम वैशिष्ट्यपूर्ण होते. त्यांचें पंजाबी भाषेचें पठण, ग्रंथसाहेबाचा अभ्यास आणि अनुवाद आणि सध्यां ते लिहीत असलेला शिखांच्या इतिहाससंबंधींचा ग्रंथ हे काकांचे ह्या उतार वयांतले उपक्रम पाहिले म्हणजे त्यांच्या चिरंजीव उत्साहाचें कौतुक वाटतें. राजकारणांतून निवृत्त होऊन तूर्त ते साहित्यकारणाला पुन्हां एकदां वाहून घेत आहेत ही घटना त्यांच्या जीवनक्रमांतल्या चक्रनेमिक्रमाच्या योगायोगाची निदर्शक अशी वाटतें. विशिष्ट कालखंडांत विशिष्ट उपक्रमाला सातत्यानें आणि एकनिष्ठतेनें वाहून घेण्याची त्यांची निरलस सेवावृत्ति पाहिली म्हणजे आगामी साहित्य सम्मेलनाच्या अध्यक्षपदाची त्यांची झालेली नियुक्ति किती सुयोग्य आहे हें पटतें. श्री. काकासाहेबांचें त्यांच्या ह्या अपेक्षित विजयाबद्दल आम्ही अभिनंदन करतों व त्यांच्या कारकिर्दींत साहित्य परिषद प्रगतीपथावर राहो असें चिंतितों.

### 'नाइन अवर्स टु राम'

महात्मा गांधींच्या खुनाच्या घटनेवर आधारलेली 'नाईन् अवर्स टु राम' या कादंबरीवर भारत सरकारनें बंदी घालून लोकमताच्या उठलेल्या गदारोळाला एकदांचे शांत केलें. मध्यंतरी या करुण घटनेनें बधिर झालेलें जनमानस, कालप्रवाहाच्या हळुवार स्पर्शानें पुन्हां कार्यक्षम होऊं लागून निष्कारण प्रज्वलित झालेली कटुतां विरून गेली होती असे असतां भारतीय इतिहासाच्या एका तथाकथित प्राध्यापकानें भारतांतल्या आपल्या वास्तव्यांत गोळा केलेल्या तुटपुंज्य ज्ञानावर दूषित अवस्त्वारोपाची पखरण घालून थिल्लर लोकप्रियता प्राप्त करून जगमान्य होण्यासाठीं या कादंबरीचा घोळ घातला. जगांत अशा अनेक विकृत कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत व होतही असतात आणि भारताच्या इंग्रजीप्रेमामुळें असल्या वाङ्मयाची आयात भारतात यथाकाल होत असते. विक्रीचा हा पहिला बहर संपताच कादंबरीचा पुन्हां मागमूसहि आढळत नाहीं. असले वाङ्मय तृतीया श्रेणीच्या लेखकांनीं निर्माण केले असल्यामुळें समीक्षक त्याची दखल घेत नाहींत आणि वाङ्मयेतिहासांत त्यांचे अस्तित्व लवलेशानेंसुद्धां प्रस्थापित होत नाही.

ह्या कादंबरीला मिळालेल्या प्रसिद्धीमुळें तिचा प्रसिद्ध झालेला तपशीलवार सारांश वाचून तिच्यांतल्या अवास्तव घटना, विकृत स्वभावचित्रण, थिल्लर कामलोलुप वाचकांसाठीं मुद्दाम योजिलेल्या कृत्या आणि मुद्दाम बदनामी करण्यासाठीं निर्माण केलेलें विपर्यस्त







अनुक्रमणिका

वातावरण ह्यांचे सदर्भदेखील मुग्ध वाचकाच्या मनांत घृणा निर्माण करतील. असल्या ह्या वाङ्मय कृतीनें गांधींसारख्या थोर भारतीय राष्ट्रपुरुषाची व भारतांतल्या राजकारणाची पुरेशी बदनामी जगभर होणार नाहीं असें वाटून मार्क रोबसन सारख्या चित्रपट निर्मात्यानें तिच्यावरून ' ए डे ऑफ डार्कनेस् ' नांवाचा चित्रपट तयार करून त्याचें कांहीं स्थळ चित्रण भारतांत करण्याची सरकारकडे अनुज्ञा मांगितली. आणि ही सवलत सहज मिळावी ह्यासाठीं सुप्रसिद्ध हिंदी नट जयराज व जे. एस्. काश्यप आणि नरेंद्रनाथ या अभिनेत्यांचें सहकार्य पत्करलें. कादंबरींत प्रस्तुत घटनेशीं दुर्दैवानें संबंधीत गणलें गेलेलें कांहीं पुढारी आणि भारताच्या राजकारणांत एका विशिष्ट मतप्रणालीचे पुरस्कर्ते असलेले सुप्रसिद्ध नागरिक यांचे सदर्भ संवादी नामसादृश्यानें स्पष्ट करून दाखवलें होते आणि तेच प्रस्तुत चित्रपटांत अनुरुप व वेषभूषेनें प्रगट करून लेखकाच्या निर्घृण आघातावर दिग्दर्शकानें अपमानाचें मीठ चोळून या व्यक्तीवर अन्याय केला आहे. प्रस्तुत कादंबरी प्रसिद्ध होऊन सहा महिन्यांचा अवधि लोटल्यानंतरच लोकमताच्या आग्रहामुळें आमच्या लोकशाही सरकारला तिच्या विकृत स्वरुपाची जाणीव होऊन तिच्यावर बंदी घालण्याची बुद्धि झाली. ह्या कादंबरीच्या इंग्रजी आवृत्तीच्या प्रकाशकांनादेखील ' रिप् व्हॅन् विकल् ' भारत सरकारच्या ह्या बंदीचे आश्चर्य वाटलें. आतां लोकमत ह्याच दिशेनें पुढें पाऊल टाकून ग्रंथापेक्षां अधिक विषारी अशा त्यावरील चित्रपटावर बंदी घालण्याचा आग्रह धरीत आहेत, आणि तो चित्रपट प्रकाशित झाल्यावर ही बंदी जाहीर होणें संभाव्य आहे. आणि तसें झालें तर चित्रपट वितरकहि भारत सरकारच्या ह्या जागरुक पर्यवेक्षणामुळें चकित होतील ह्यांत संदेह नाहीं. ही बंदी अगोदरच घातली गेली तर परकीय दिग्दर्शकाच्या कर्तृत्वाबरोबरच ज्या भारतीय नटांना त्यांत भरपूर वेतनावर अलौकिक भूमिका करण्याचें भाग्य लाभलें त्यांच्या असामान्य अभिनयाचें प्रदर्शन स्वदेशांत न झाल्यामुळें स्वकीयांवरहि अन्याय केल्यासारखें होईल, म्हणूनच कदाचित् लाल फितीची वाटचाल अजून कूर्मगतीनें होत आहे.

## सत्यं, शिवं, सुंदरम्

### श्री. दादासाहेब रेगे

चालू महिन्याच्या पंचवीस तारखेला भारताचे राष्ट्रपति राधाकृष्णन् ह्यांच्या हस्तें भारत सरकारकडून यंदा ज्या शिक्षकांचा बहुमान करण्यांत आला आहे त्यांना प्रशस्तिपत्र व मानधन देणाचा समारंभ राजधानींत होणार आहे. अध्यापन करून समाजाची विशेष सेवा केल्याबद्दल शिक्षकांना राष्ट्रीय पारितोषिक देऊन त्यांची समाजांत प्रतिष्ठा वाढावी ह्यासाठीं भारत सरकारच्या शिक्षण खात्यानें १९५८ सालीं प्रस्तुत उपक्रम सुरू केला हें स्तुत्य झालें. आजपर्यंत १३८ प्राथमिक व १२१ माध्यमिक शिक्षकांचा ह्या पारितोषिकाद्वारें गौरव केला गेला. यंदा ज्या ८५ शिक्षकांना हा बहुमान प्राप्त झाल्याचें घोषित करण्यांत आलें आहे. त्यांत महाराष्ट्रांतले चार प्राथमिक व दोन माध्यमिक शिक्षक आहेत. प्रस्तुत प्राथमिक शिक्षकांत ज्यांचा विशेष उल्लेख करणें प्राप्त आहे असे मुंबईच्या बालमोहन विद्यामंदिराचे संस्थापक व सुपरिंटेंडेन्ट श्री. दादासाहेब रेगे आहेत. दादासाहेबांनीं गेलीं एकेचाळीस वर्षे ज्या शिक्षकाच्या पेशांत निष्ठेनें आणि कार्यक्षमतनें व्यतित केलीं त्यामुळें त्यांचा असा गौरव व्हावा ह्यांत नवल नाहीं. कोंकणांतल्या हेदूळच्या खेडगांवातल्या शाळेंत आपल्या ध्येयसिद्ध व्यवसायांत वयाच्या सोळाव्या वर्षी सुरवात करून दादासाहेबांनीं पुढें मुंबईच्या ख्यातनाम डेव्हिड सासून रेफॉमेटरींत सतरा वर्षें ज्ञानदानाचें कार्य केलें. पुणें ट्रेनिंग कॉलेजमध्यें शिक्षणशास्त्राचा विशेष अभ्यास करण्याची संधि मिळाल्यानंतर आदर्श विद्यार्थ्याप्रमाणें त्यांनी अभ्यास करून परीक्षेंत उच्चांक व पारितोषिक मिळविलें. १९४० सालीं त्यांनीं बालमोहन विद्यामंदिराची स्थापना केली. संस्थेच्या स्थापनेसाठीं लागणारें धन व मनुष्यबळ जवळ नसतांही केवळ उच्च ध्येयानें प्रेरित होऊन केलेली ही सुरवात केवळ ईर्षेनें व प्रयत्नांच्या सातत्यानें त्यांनीं प्रगतिपथावर नेऊन आज दहालक्ष रुपये किंमतीची शाळेची इमारत, हजारों पालकांचा आत्मविश्वास व कित्येक दशसहस्र विद्यार्थ्यांना केलेल्या ज्ञानदानाचें पुण्य जवळ बाळगून दादासाहेबांनीं आपलें कार्य तितक्याच हिरीरीनें चालू ठेवलें आहे. विशेषतः यंदा शिक्षकदिनाच्याच दिवशीं त्यांचा हा गौरव झाला हें सार्थ झालें. एका कर्मयोगी व निष्ठावंत महाराष्ट्रीय शिक्षकाचा झालेला हा गौरव महाराष्ट्राला अभिमानाचा वाटावा ह्यांत संदेह नाहीं. दादासाहेबांचे आम्हीं अभिनंदन करतों व त्यांच्या ह्या सेवाव्रताच्या राज्यमान्यतेमुळें ते उत्तरोत्तर अशेंच कार्यक्षम राहून महाराष्ट्राला ललामाभूत ठरोत असें ह्या शुभप्रसंगी चिंतितों.

## क्रीडा

### आशियाई क्रीडा महोत्सव

गेल्या महिन्यांत जकार्ता येथें भरलेल्या आशियाई क्रीडा महोत्सवाच्या खिलाडू वातावरणांत दूषित जागतिक राजकारणाच्या पदस्पर्शाच्या निमित्तानें धूळवड झाली. प्रस्तुत सामन्यांत भाग घेण्याचा हक्क सर्व आशियाई देशांना असतांना सामन्यासाठीं प्रतिनिधित्व करणाऱ्या संबंधित देशांपैकीं इस्राएल व फोर्मोसा ह्या देशांच्या खेळाडूंचा अंतर्भाव झाला नाहीं किंबहुना त्यांना जकार्तांत प्रवेश करण्याची सवलत नाकारण्यांत आली. ह्या घटनेनें सामन्याच्या ऐन रंगांत यथाकाल सुरू होणाऱ्या वेटलिफ्टिंगच्या सामन्यांना इंटरनॅशनल वेटलिफ्टिंग फेडरेशननें मान्यता नाकारली एवढेंच नव्हे तर ह्या मान्यतेच्या अभावीं जर हे सामने घेण्यांत आले तर त्यांत भाग घेणाऱ्या खेळाडूंवर बहिष्कार जारी करण्याचा निर्णय प्रगट केला. प्रस्तुत फेडरेशन तसेंच ॲथलेटिक फेडरशन ह्यांच्या आग्रहामुळें ह्या सामन्यांचें आशियाई स्वरूप अमान्य ठरवून त्याचें नांव बदलावें असा प्रस्ताव पुढें झाला. विशेष म्हणजे आशियाई फेडरेशनचे उपाध्यक्ष श्री. सोंधी ह्यांच्याच हातींत हा ज्वलंत पलिता देऊन सामन्यास अपशकुन करण्याचा उपक्रम आंतरराष्ट्रीय राजकारणांतल्या मुत्सद्दी राष्ट्रप्रतिनिधींनी करावा आणि लंकेस आग लावण्याच्या उत्साहानें स्वतःची शेपटी पेटवून इतस्ततः फिरणाऱ्या हनुमानाच्या ईर्षेनें श्री. सोंधी ह्यांनीं हें आव्हान स्वीकारण्यास पुढें जावें हें भारताच्या फाजील बोलघेवड्या व अपक्व मुत्सद्देगिरीचें सुपरिचित उदाहरण आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणाचे पडसाद क्रीडाक्षेत्रांत उमटूं द्यावें कीं नाहीं हा वादाचा प्रश्न असला तरी श्री. सोंधी ह्यांचें अदूरदर्शी वक्तव्य प्रस्तुत प्रसंगीं अस्थानीं होतें असें कोणीहि विचारवंत मान्य करील.

—सारस्वत









अनुक्रमणिका



# समीक्षकास नमीत दास.....

—रसिक मनोहर

(उत्तरार्ध)

'कोल्हा आणि द्राक्षं' हा बाबल्या देवांनी रूपांतरित केलेला फार्स त्यांच्या आतांपर्यंतच्या नाटकांत सर्वांत जास्त निर्दोष आहे. 'कुत्र्याचें शेंपूट', 'कावळ्याची शाळा' (प्रकाशित न झाल्यामुळें गुलदस्तांत जमा झालेलं. मराठी साहित्यपरंपरेनं आपल्या नाट्यशाखेची केलेली ही आबाळ भयानक आहे!) नाटकानंतर त्यांनीं लिहिलेलं हें तिसरें नाटक.

हें नाटक मन गुंगवून टाकणारं परंतु बव्हंशी अनाकलनीय आहे. नाट्यप्रकाराचे रूढ व ढोबळ संकेत कसल्या अचूकपणें झुगारून देण्यांत आले आहेत. संवादांची धाटणी कांहीं चमत्कारिकच आहे. अन् पात्रांच्या हालचाली संवादापेक्षांही महत्त्वाच्या आहेत. रंगमंचावरील अंधार बोलका असून कांहीं प्रसंगीं प्रकाश धूसर, अबोल वाटतो! नाटकाचा अर्थ काय असं विचारलं तर चटकन् उत्तर देतां येणार नाहीं. त्याच्याविषयीं कितीही लिहिलं तरी नाटकाचं स्वरूप अस्पष्ट रहाण्याचा संभवच अधिक. फार तर एवढंच सांगतां येईल कीं, रंगभूमि हें काय प्रकरण आहे हें स्वच्छ व स्पष्टपणें लक्षांत आणून देण्याजोगा नाटकाचा घोटीव व परीटघडीचा प्रयोग झाला. अभिजात विनोद व कारुण्याच्या अस्सल छटा या नाटकांत अशा कांहीं एकजीव झाल्या आहेत की त्यामुळं नाटकाला श्रेष्ठ म्हणण्यांत फारशी चूक होणार नाहीं!

तिसऱ्या अंकांत गंभीरपणाची छाया पडलेली आहे. परंतु हा अंक सर्वच्या सर्व गंभीर नाहीं. आगंतुकपणें गंभीर आहे ती त्यांतली मध्यवर्ती घटना. ही मध्यवर्ती घटना किंचित् भडक वाटते ती अपुऱ्या मानसशास्त्रीय बैठकीमुळं. भावनाविष्काराच्या पातळ्या एकमेकांना भाऊगर्दीनें चाटून जातात—पण कारण नसतांना! संवादाचा भरघोसपणा हा सुद्धां निरर्थक वाटतो. (पण रंगमंचावर असली लांबी प्रेक्षकांना मारून टाकूं शकते, हें देवांसारख्या हाडाच्या नाटककाराला माहीत नसल्यास नवल!)

नटसंचांत कुशल नटांबरोबर कांहीं नवखे कलावंतही दिसतात. त्या साऱ्यांकडून बऱ्यापैकीं काम करून घेण्यास समर्थ ठरतं तें शेंड्यांचें खणखणीत (रुपया वाजवून घ्यावं तसलं) दिग्दर्शन. नव्या मंडळीचा नवखेपणा अनुभवी जोडीदारांपुढं उघडा पडतो (रुपयाचा खुर्दा रस्त्यावर पडून त्यांतलीं कांहीं नाणीं गहाळ व्हावीत तसा कांहींचा अभिनय हरवतो, तर कांहींचा अभिनय खोट्या नाण्यासारखा बद्द वाटतो!) हेंद्रयाचं अलिकडचं कुठलंही काम पाहिलं कीं त्यांच्या ऐतिहासिक भूमिकांची वारंवार आठवण होते. त्यांच्या अभिनयांत 'आधीं लगिन कोंडाण्याचें'-मधल्या तानाजीनं संचार केल्यासारखं वाटतं. ते नेहमींपेक्षां कमी ओरडले हे कौतुकास्पद. त्यांचं तबलावादन सुद्धां लटकं वाटतं! डिकॉस्टा ह्यांच्या कामांत पंतोजीपणा अधिक होता तर बळवंत जयकृष्ण, गजा वाबळे, सदू भाटे ह्यांच्या रंगभूमीवरील बोलण्याचालण्यांत शाळकरी शिकाऊपणा आढळला! उमेश उत्रावर, पोंबुर्लेकर गोपाळ टक्के ह्या 'रंगढंग'च्या नेहमीच्या कार्यकर्त्यांना शाळेंत घंटेचे मार्क द्यावेत तशा लहानसहान भूमिका बहाल करण्यांत आल्या होत्या. त्यांतले कांहींजण











अनुक्रमणिका

उगाच नांवापुरते एकदोनदां नाटकांत येऊन जातात. रंगभूमीवर येणाऱ्या प्रत्येक पात्राला 'भूमिका' असणं इष्ट आहे. श्री. भाई खारकर आत्मविश्वासानें विदुषकी भूमिकेंत वावरतात, पण हंशा घेण्याच्या मोहांत इतर पात्रांना 'खाऊन' टाकतात. (एक दोनदां तर त्यांनीं आपले व इतरांचे संवाद खाऊन टाकले. या पात्राचा खादाडपणा इतक्या थराला जाऊं नये!) डोळसपणें पहातांना एक गोष्ट नजरेंत भरते ती म्हणजे बाजी वांदवडेकर यांचा खोंचक व तपशिलवार अभिनय. फार्सिकल अभिनयाचं आदर्श प्रात्यक्षिकच (ही स्तुति नसून, वस्तुस्थिति आहे!) तिन्ही अंकांच्या सुरवातीला टेबलं, खुर्च्या आदींवरील (नसलेली) धूळ साफ करीत असतांना, मालकिणीनं आंतून हांक मारताच, 'आलों जी—' अशी आरोळी ठोकून पडद्यांत धांव ठोकण्याचं काम इकडच्या नटाला डी. डी. टी. (डायनॅमिक ड्रॅमॅटिक थिएटर) च्या 'नरो वा वानरो वा' या नाटकांतील बाबा कानडीसारखं जमलं नाहीं. (बाबाला परमेश्वरानं जणूं एवढ्या-साठींच निर्माण केल्याइतकी तो ती आरोळी टाईमावर ठोकीत असे!) कांता नामजोशी प्रेक्षकांकडे पहाण्योचे टाळतात. पायाला मुंग्या आल्याप्रमाणें एकाच जागीं चुळबूळ करून संवाद म्हणतात. एका रिंगणांत वावरल्यासारखी त्यांची हालचाल होते. स्टेशनांत हळूंहळूं शिरणाऱ्या आग-गाडीप्रमाणें त्यांचा अभिनय वाटचाल करतो. प्रेक्षकांपर्यंत तिरासारखा जाऊन पोंचेल असा अभिनय त्यांनीं अंगी बाणवला पाहिजे. सौ. उमा साधले ह्यांनी आपली भूमिका मोठ्या ठसक्यांत केली. (धनवट्यांनीं काढलेल्या एखाद्या व्यंगचित्राप्रमाणें त्या दिसत होत्या!) मल्लिका जोशी नुसत्या उंचीतच गेल्या. त्यांच्या अभिनयाला रुंदाई व गोलाई येणें आवश्यक आहे.

नेपथ्य वास्तववादी होतं. तिन्हीं अंकांतली दृश्यें मुळांत नाट्यमाध्यमाला साजेशीं—त्यांत तीं नेपथ्यकारांनीं अस्सलपणें उभी केली होतीं. (नेहमीं वास्तवदर्शी व रंगमचाला न पेलणारें नेपथ्य योजणाऱ्या 'अॅग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक' नें, तसंच मारवाडी भडकपणाचें निदर्शक असं रंगीबेरंगी नेपथ्य योजण्याचा—नाटकाचं दिग्दर्शन छगनलाल ड्रेसवाला ह्यानंच केलं आहे असं वाटण्याइतपत—हव्यास बाळगणाऱ्या 'लिलिपुट थिएटर'नें याबाबत थोडें शिकण्या-सारखें नाहीं कां?) पण पडद्यांतल्या फटींतून, विंगेत उभे राहून स्टेजवरच्या पात्रांना, वाद-कांना सूचना देणारें; कुणी पात्र चुकलं कीं, कपाळावर हात मारून आकस्ताळीपणा कर-णारें दिग्दर्शक स्पष्ट दिसत होते (या साठींच निदान टीकाकारांना तरी कोपऱ्यांतली सीट देऊं नये!)

प्रकाशयोजनेच्या बाबतींत मात्र 'रंगढंग' अजूनही धुळाक्षरंच गिरवीत आहे.

हें केसभर दोष काढण्याचें प्रयोजन एवढंच कीं, समीक्षेशिवाय प्रगति नाहीं ह्या वचनाची बूज राखणाऱ्या 'रंगढंग' ह्या आघाडीच्या हौशी संस्थेंत या श्रेऱ्यांचा विधायक विचार व्हावा! (जातां जातां एक उल्लेख मुद्दाम करावासा वाटतो! याच विषयावरलं श्री. सुमंत घाणेकरांचं 'तुटलेला पतंग' हें नाटक किती उजवं आहे. अत्यंत सफाईनं बसविलेलं हें नाटक दोन–तीन प्रयोगांतच 'झोपलं'! इथेंच निर्मळ कलाकृतींचा वाङ्मयीन मांजा प्रायोगिक यशाच्या सुरती मांजानें काटला जाण्याचा धोका जाणवतो. ह्या नाटकाबाबतची आतां स्मृति शिल्लक आहे ती 'पतंगाची दोरी कीं धागा—?' हा लेखन–कामाठी करणारे समीक्षक व हौशा व नवशा पत्रलेख-कांनीं गाजविलेला वाद! एक भयानक स्वप्न म्हणून हें नाटक व हा वाद विसरून जावं हेंच बरं!)

—रंजन

बाबल्या देव या नांवाशी विनोदी फार्स हे शब्द आतां निगडीत झाले आहेत. 'कुत्र्याचें शेंपूट' ह्या फार्सनें या नाट्यप्रकाराचें पुनरुज्जीवन झालें. मध्यंतरी एकदोन नाटक-कारांनीं फार्स लिहिण्याचे प्रयत्न केले, पण त्यांतले खरोखरच 'प्रयोग' ठरले! फार्सची भट्टी त्या बिचाऱ्या नाटककारांना जमली नाहीं व ते आंता मुलांसाठीं नाटकें लिहूं लागले आहेत.

बाबल्या देवांच्या फार्समध्यें अश्लील विनोद फार असतात अशी ओरड टीकाकार करतात. पुष्कळ विनोदी नाटकांत थोड्याबहुत प्रमा-णांत अश्लीलता असतेच. बाबल्या देवांच्या-नाटकांत ती थोडी अधिक असते इतकंच! चार घटका पोटभर हंसायच तर डोकं (असलंच तर!) घरीं ठेवून 'कोल्हा आणि द्राक्षं' हा 'फार्स' जरूर पहावा! उगाच 'नाटका'शीं तुलना करीत बसूं नये. खायची भेळपुरी आणि म्हणायचं बिर्यानीची चव येत नाहीं! आमचे मराठी प्रेक्षक फार्स बघ-तात, हंसतात, टाळया वाजवतात मग बिचारे टीकाकारें कांहींही म्हणोत. ते बिचारे 'आदतसे मजबूर' आहेत. बाबल्या देवांनीं तिकडें लक्ष देऊं नये. किस्मत तुम्हारे साथ है, जलनेवाले जला करे!

श्रीराम शेंड्यांच्या सुंदर दिग्दर्शनानें दुधांत साखरच काय पण केशर पडलें आहे! आकर्षक नेपथ्यानें नाटकाचा 'गेट अप्' मोहक झाला आहे, सुंदर वेष्टनानें चॉकलेटचा व्हावा तसा! पार्श्वसंगीतानें नाटकाच्या रंगतीला चांगलीच फोडणी दिली!

हा फार्स प्रेक्षकांना सतत हंसत ठेवतो. फार्स बघतांना एकदांही हंसणार नाहीं अशा प्रेक्षकाला तिकिटाचे पैसे परत करण्यांत येतील अशी 'रंगढग'नें खुशाल जाहिरात करावी. असा एखादा 'कोरडा' मनुष्य सांपडलाच तर 'स्थितप्रज्ञ' कसा दिसतो हा प्रश्न सुटेल. अशा माणसाला मी म्हणेन, 'हाय कंबख्त तूने पीहि नहीं!'

—फरारी

आपल्या नाटकामुळें आणि त्याहीपेक्षां त्यांच्या प्रस्तावनेमुळें गाजलेले तरुण नाटक-कार बाबल्या देव आतां गंभीर नाटकांकडून विनोदी नाटकांकडे 'वळले' आहेत हाच सर्वांत मोठा विनोद! परंतु त्यांच्या 'कोल्हा आणि द्राक्षं' ह्या नाटकांत अधूनमधून जबरदस्त गंभीर भाग डोकावतो. बाबल्या देव विनोदाकडे 'अर्धवट वळल्यामुळें' हें घडलें असेल! हें गंभीर प्रसंग फार विरस करतात एवढें मात्र खरें.

Heaven becomes Hell या पाश्चात्य रंगभूमीवर व पडद्यावर गाजलेल्या कलाकृतीचें 'कोल्हा आणि द्राक्षं' हें स्वैर रूपांतर आहे. परक्या नाटकाचें मराठींत रूपांतर करतांना मूळ नाटकाचें सौंदर्य नष्ट करण्याचे विक्रम आजवर अनेकांनी अनेकदां केले. पण देवांनीं मात्र ह्याबाबतींत रेकॉर्ड ब्रेक केला आहे!

हें नाटक म्हणजे Problem Play आहे. समस्याप्रधान नाटक म्हणजे काय हें नीटपणं सांगणं हीच एक समस्या आहे. नाटकांतली समस्या संपली तरी आपण काय पाहिलं अशी प्रचंड समस्या जें नाटक प्रेक्षकांसमोर उभी करतं तें समस्याप्रधान नाटक असं एक वात्रट प्रेक्षक म्हणाला. समस्या संपली कीं तिची तीव्रता कमी होऊन, नाट्यात्मता लोप पावण्याचा अशा नाटकांचा कमकुवतपणा 'कोल्हा आणि द्राक्षं' ह्या नाटकांत प्रकर्षानें अनुभवास आला. अशा रीतीनें रंगतीचा प्रश्न निकालात निघाल्यावर प्रश्न उरतो तो सादर करण्याचा.

नाटक 'खालीं' आणण्याच्या प्रयत्नाला नटसंचापैकीं कोणाचाच विरोध दिसून आला नाहीं. बहुतेकांनीं नाटक जेवढं खालीं खेचतां येईल तेवढें यथाशक्ति खेचलें. बलवंत जयकृष्ण, गजा वाबळे यांचीं कामें आणखी 'वर' जायला जरूर वाव होता. नन्ना चावरेचा आवाज व मुद्राभिनय यांत बराच 'कोरडेपणा' दिसून आला. त्यांत अजून 'ओलावा' निर्माण व्हायला हवा. श्री. सदू भाटे ह्यांनीं मान जरा कमी हलवावी (म्हणजे ती मोडण्याची भीति वाटणार नाहीं!) सौ. हेमलता आजगांवकर ह्यांचे उच्चार लताबाईंच्या नाण्यावर पोसलेल्या मुलीप्रमाणं (यांत रंगभूमीवरील कांहीं नटी सांपडाव्यात!) लाडीक, चोरटे आहेत. 'कोल्हा आणि द्राक्षं' मध्यें ओपनिंग बॅट्समेन होते वऱ्हाडपांडे आणि फडतरे. त्यांचे 'दादोबा पांडुरंग' छाप बोलणें खटकत होतें. ह्या सुरवातीच्या घसरगुंडीमुळें व पुढचें कलावंतही फिकेच असल्यामुळें सबंध नाटकच गुंडाळलें गेलें! उद्धव कुळकर्णी ह्यांनीं सबंध नाटकांत एकच सदरा व पायजमा कां घातला कळलं नाहीं. मीनल परांजपे दुसऱ्या अंकांत एकदां बाहेर येतात तेव्हां आधीची साधी साडी बदलून सिल्कची साडी नेसून येतात. सबंध अंकभर त्या घराबाहेर जात नाहींत मग ही कपडे बदलण्याची यातायात कशाला? सर्वांत निकृष्ट भूमिका झाली ती उमा साधले यांची. त्यांची अंगलट त्या भूमिकेला अगदींच अयोग्य. व त्याहीपेक्षां वैताग आणणारी गोष्ट म्हणजे त्यांचे 'जंगली' उच्चार! त्यांच्या अभिनयानें नाटकावर बराच अन्याय झाला.

श्री. श्रीराम शेंडे यांच्यासारखा चोखंदळ दिग्दर्शकानें ही भूमिका कशी 'खपवून' घेतली हेंच आश्चर्य! प्रमुख पात्रांना भूमिकाच आकलन न झाल्यामुळें नाटकाची इमारत ढांसळते आणि अगोदरच कंगोरे असलेल्या या नाटकाचा पुरता तोल जातो. परंतु संपूर्ण अवलोकनाची वेळ घेतांच श्री. शेंडे यांच्या आगळ्या दिग्दर्शनानें हा प्रयोग रंगला होता हें मान्य करावें लागेल. त्यांनी पात्रांना सांवरून धरण्याचा प्रयत्न केलेला दिसला, पण पात्रेंच कमजोर त्याला ते काय करणार?



सामान्य कथा व फालतू अभिनय यांच्या जोडीला प्लेबॅक संगीताचा 'झिजिया कर'हि वसूल करण्यांत आला. ह्या प्रकारानें कान अक्षरशः किटले! त्यांत तिसऱ्या अंकांत सौ. पिरोज पाठारे इतक्या काळजीपूर्वक तोंड हलवित होत्या कीं, 'मी मुळींच गात नाही हो-' असं त्यांना प्रेक्षकांना बजावून सांगायचं होतं. ह्या नाटकांत गाण्याऐवजीं देव नाच्य घालते तर! पण मग त्यांना कचाट्यांत सांपडलेल्या प्रेक्षकांची खोड कशी मोडता आली असती!

तोंड फाटेपर्यंत स्तुति केली पाहिजे (आणि अक्षरशः खरी अशी!) ती श्री. अनंत धनवटे ह्यांच्या नेपथ्याची. बागेच्या कंपाउंडची प्रत्येक वीट मापून घ्यावी, शेल्फवरील चहासाखरेचे, डालडाचे डबे, बाटल्या, बरण्या मोजून घ्याव्यात, गॅलरीचं रेलिंग व त्यावरची डालडाच्या डब्यांतलीं कुंडी ही निरखून पहावी! ह्याला म्हणतात कलाकाराची किमया! परंतु भिन्ती म्हणून काळे कुळकुळीत पडदे दाखवणें हें वास्तवाला धरून आहे काय? कीं पुढें नाटकांत (आणि पर्यायानें नाटकाचेंहि!) कांहीं काळेबेरें होणार आहे त्याची प्रतीकात्मक सूचना?

नाटक विनोदी असल्यामुळें प्रेक्षक अधूनमधून हंसत होते, पण ते उसळतें हास्य नव्हते! प्रयोग अखेरपर्यंत पहावा असें वाटत होतें, पण तो रंगला मात्र नाहीं!

खरंतर ह्या नाटकाचा इतका समाचार घेण्याची गरजहि भासूं नये. परन्तु 'रंगढंग' ह्या आघाडीच्या मातबर हौशी संस्थेनं हा प्रयोग सादर केल्यामुळें समीक्षणाचा हा प्रपंच केला!

—रागरंग

मुळांत करूण-गंभीर असलेला आशय विनोदाचें आवरण चढवून प्रेक्षकांपुढें ठेवला कीं नाटककार कसा तोंडघशीं पडतो ह्याचं उदाहरण म्हणजे श्री. बाबल्या देवांचं 'कोल्हा आणि द्राक्षं'. नाटकांत 'तसा' विनोद भरपूर आहे. अनेक 'रेडिमेड' चित्रांचा अवलंब करून लेखक प्रेक्षकांना हंसवतो एवढें खरें. परन्तु पुढें अचानक मिळणाऱ्या करूण कलाटणीशीं प्रेक्षक प्रयत्न करूनही समरस होऊं शकत नाहीं. लेखकाची ही Sugar coated pill प्रेक्षकांना कोयनेलच्या गोळीसारखी वाटते! (मराठींतील बहुसंख्य रसिकांच्या नाट्यविषयक ज्ञानाबद्दल साशंक असलेले देव ही टीका मान्य करण्याचा संभव कमीच!)

परकीय फार्सच्या रूपांतरामुळें देवांच्या विनोदांतील व प्रसंग-योजनेंतील तोच तोचपणा प्रेक्षकांच्या अति परिचयाचा झाला आहे. त्यांनीं रूपांतराची वाट सोडून स्वतंत्र नाटकाचा मार्ग धरावा. नाहीपेक्षां 'हा नाट




सोड सोड—' असा सल्ला प्रेक्षक देवांना देतील.

प्रभाकर वारंग संवाद बरे म्हणतात पण चेहरा निर्विकार ! मंगला डोंगरे यांनीं 'होहो' म्हणण्याची विशिष्ट पद्धत सोडली तर त्यांची भूमिका सरस ठरली असती ! कमरेवर हात ठेवण्याच्या संवयीपायीं एका पात्रानें आपले हंसे करून घेतले. मीनल परांजपे दुसऱ्या अंकांत एकदां आंत जाऊन पुन्हां बाहेर येते तेव्हां तिची वेशभूषा बदललेली असते. वरकरणीं ही गोष्ट चुकीची वाटेल. पण प्रियकराच्या भेटीमुळें तिच्यांत झालेल्या बदलांचें तें सूचक होतें हें कळण्याची कुवत प्रेक्षकांत तर सोडाच, पण नाट्य-समीक्षकांत तरी आहे कीं नाहीं शंकाच आहे.

फ्लॉवर पॉटमधील पाणी पिणें, शू स्टॅंडवरील बूटानें भिंतींत खिळा ठोकणें, कपाटाच्या दाराच्या आडोशाला राहून कपडे बदलणें इ. रंगमंचावर असलेल्या वस्तूंचा अधिकाधिक वापर करण्याचें तंत्र उत्कृष्टपणें संयोजित केलेलें आहे. श्री. शेंडे ह्यांच्या दिग्दर्शनांतील कल्पकतेचा परमोच्च बिंदूच !

विशेष लक्षांत राहिलें तें श्री. अनंत धनवटे यांचें प्रेक्षणीय कल्पक नेपथ्य ! आठ-दहा हजार रुपये खर्च करून राजेशाही थाटांत प्रयोग सादर केलेला आहे. हौशी नाट्यसंस्थेनें जरी नाट्य निर्मिती केली असली तरी 'धंदा' म्हणून नाटक यशस्वी होणं इष्ट आहे हें नेपथ्यकारांनीं लक्षांत घेऊन अवाढव्य खर्चाच्या नेपथ्य-रचनेचा मोह टाळावा ! ह्या नाटकांतील नेपथ्याचा खर्च तीन-चार हजारांनी तरी कमी करावा ही श्रीराम शेंड्यांना आग्रहाची प्रेमळ सूचना.

रंगभूमीवर नाटकांचे पहिले प्रयोग करणे जिकीरीचें काम आहे. ह्या नाटकाचा पहिला प्रयोग यशस्वी झाला व प्रेक्षकांच्या अपेक्षा पूर्ण झाल्या असं म्हणता आलं नाहीं तरी ह्या नाटकाचा दुसरा प्रयोग रंगणार हें निश्चित ! त्यानंतर हें 'सेट' झालेलं नाटक क्रिकेटमध्यें 'सेट' झालेल्या फलंदाजाप्रमाणें शतक झळकावील. कारण एखादें नाटक लोकप्रिय झालें कीं नाटक न पाहिलेले (आणि पाहिलेलेहि) प्रेक्षक तें पहावयास गर्दी करतात असा आजवरचा अनुभव ! मराठी प्रेक्षक या नाटकाला डोक्यावर उचलून धरतील त्याबद्दल मुळींच शंका नाहीं.

—जगन्मित्र

मी ती फाईल परत शामूच्या हातीं दिली.

'खरं सांगू-तुमच्या नाटकांपेक्षाही अधिक करमणूक केली ह्या फाईलनं, कांहीही कर न घेतां...'

'करा थट्टा तुम्हीं. फुकटची गंमत बघायला काय जातंय तुमचं. आम्ही जातों जिवानिशीं—'

'—आणि समीक्षक म्हणतात वातड !'

● ● ●

(पान ५२ वरून)

काय होणार आहे? सगळ्यांना असं दोरखंडानें आवळल्यावर, ते असहाय्य होतील. त्या त्यांच्या तशा असहाय्य अवस्थेंत पामर मग त्यांच्यावर गोळीबार करील. जॉर्मन हें ओळखून होता आणि तरीही प्रत्येकाभोंवतीं तो दोरखंड आवळीत होता! काय करणार? तोही असहाय्यच होता !!

जॉमनची प्रत्येक हालचाल पामर न्याहाळीत होता. पण जॉर्मनचे विचार-चक्रही जोरांत चालूं होतें. कसंही करून त्याला पामरच्या शेजारी जायचं होतं. तोही पामरला न्याहाळीत होता. पामर मधूनच छताकडे पिस्तुलाचे टोक धरी व उगाच इकडे तिकडे न्याहाळी. म्हणजे हे क्षण त्याच्या बेसावधतेचे होते. ह्या बेसावध क्षणींच पामरच्या अंगावर उडी टाकली पाहिजे असा धाडसी विचार जॉर्मननें केला. आणि हें करण्याकरतां त्याला एडवर्डच्या जवळच राहिलें पाहिजे. कारण जसजसा तो इतरांना बांधीत जाईल तसतसा तो पामरपासून लांब जाईल. पण पामरच्या जवळ जाण्यासाठीं जॉर्मननें दुसरी एक शक्कल शोधून काढली !

त्या सातहीजणांच्या पायांजवळ पामर उभा होता. जॉर्मन ताडकन् पामरला म्हणाला, 'ह्यांच्या पायाभोंवती आवरण मला इथून नीट बांधतां येत नाहीं.'

'मग त्यांच्या पायाजवळ येऊन बांध' पामर उत्तरला. लगबगीनें जॉर्मन त्या सर्वांच्या पायाशी गेला. आतां तो पामरच्या अंतर्दी जवळ आला होता !

पामरचा तो बेसावध क्षण त्यानें बरोबर हेरला व कांहीं एक विचार न करतां सगळें बळ एकवटून त्यानें पामरच्या दोन तंगड्या ओढल्या व चपळाईनें उठून पिस्तुल असलेल्या त्याच्या हातावर जोराची थप्पड मारली. त्याबरोबर पिस्तुल दूरवर उडालं व पामर तंगड्या ओढल्यामुळें खाली पडला. लगेच जॉर्मन त्याच्या छातीवर बसला आणि ज्यांना अजून बांधलं नव्हतं त्या पांच जणांना तो म्हणाला, 'या, दोस्तहो!'

ते पांचजण पामरवर तुटून पडले. हा प्रकार चालूं असतांना राल्फ रसेल हा कॉन्ट्रॅक्टर आंत आला.त्याला पाहून कोणीतरी ओरडलं, 'पामरला पकडला आहे आम्हीं रसेल. पोलिसांना बोलाव ताबडतोब !'

कांहीं क्षणांतच 'जॉर्मन ब्रदर्स्'च्या ऑफिससमोर पोलिसांची मोटार येऊन उभी राहिली. !

निर्विकार चेहरा असलेल्या पामरला त्यांनीं पकडून नेलें.

पोलीस त्याला घेऊन गेल्यावर जॉर्मन व ते सातही जण एकमेकांकडे 'केविलवाण्या' नजरेनें पाहूं लागले. अगदीं निःशब्द अवस्थेंत ! 'आपलं काय झालं असतं ?' ही कल्पना येऊन त्यांचं शरीर अजूनही शहारत होतं.

लुईस जॉर्मनला त्याच्या शौर्याबद्दल रौप्य-पदक देण्यांत आलं. सध्यां पामर, १८० वर्षांचा कारावास, ही कठोर शिक्षा भोगीत आहे.

● ● ●

हें मासिक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०।४२ कॅनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रकाशित केलें.






REGD. NO. B–7640

OCTOBER 1962

DIPAVALI MONTHLY